

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ५६ । अंक ५ । फेब्रुवारी २००२




भारतीय समाज आणि संस्कृती यांच्या इतिहासामध्ये सिंधू नदीच्या खोऱ्यात उत्कर्ष पावलेल्या संस्कृतीचे स्थान व महत्त्व काय, या प्रश्नाचे आपले एक विशेष प्रयोजन आहे. भारतात जी वैशिष्ट्यपूर्ण वैदिक संस्कृती विकास पावली, आणि जिचा प्रभाव आजही आपल्या विचार, मान[illegible] जीवनरीती यांच्यावर आढळतो, त्या वैदिक संस्कृतीचा आणि सिंधू संस्कृतीचा परस्पर अनुबंध होता का, आणि असलाच तर कोणत्या स्वरूपाचा होता.





अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५६ । अंक ५ । फेब्रुवारी २००२
पौष-माघ, शके १९२३
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








# नवभारत

## अ नु क्र म



या अंकातील, प्रा. नीरज हातेकर यांचा 'एम.एन. रॉय यांचा राजकीय व आर्थिक विचार व सद्यःस्थितीतील भारत' आणि श्रीमती रुपा रेगे-नित्सुरे यांचा 'रॉयवादी आर्थिक विचार आणि भारतीय अर्थव्यवस्थेचे स्वरूप' हे दोन लेख *तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी जन्मशताब्दी विशेषांक* (प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई, इ.स. २००१) या प्रकाशनामधून येथे पुनर्मुद्रित रीत आहोत – संपादक

मुखपृष्ठ : **सुजित पटवर्धन**



अनुक्रमणिका

# सिंधू नदीच्या खोऱ्यातील नागर हराप्पा संस्कृती

**वसंत पळशीकर**

भारतीय समाज आणि संस्कृती यांच्या इतिहासामध्ये सिंधू नदीच्या खोऱ्यात उत्कर्ष पावलेल्या संस्कृतीचे स्थान व महत्त्व काय, या प्रश्नाचे आपले एक विशेष प्रयोजन आहे. भारतात जी वैशिष्ट्यपूर्ण वैदिक संस्कृती विकास पावली, आणि जिचा प्रभाव आजही आपल्या विचार, मानस व जीवनरीती यांच्यावर आढळतो, त्या वैदिक संस्कृतीचा आणि सिंधू संस्कृतीचा परस्पर अनुबंध होता का, आणि असलाच तर कोणत्या स्वरूपाचा होता, अशीही वरील प्रश्नाची फेरमांडणी करता येईल.

प्राचीन भारताच्या इतिहास व संस्कृती यांचा अभ्यास आर्किआलॉजी या शास्त्राच्या आधारे करणाऱ्या प्रा. शिरीन रत्नागर यांनी अलीकडे *अंडरस्टँडिंग हराप्पा* या मथळ्याचे पुस्तक लिहिले आहे. *सिंधू नदीच्या खोऱ्याच्या प्रदेशातील तसेच अफगाणिस्थान, बलुचिस्थान, मध्य आशिया या संलग्न प्रदेशातील गावे, शहरे, वस्त्या यांच्या उत्खननांमधून हाती आलेल्या विभिन्न प्रकारच्या वस्तूस्वरूपातल्या (artefacts) व अन्य पुराव्यांच्या आधारे त्यांनी एक अद्ययावत, वस्तुनिष्ठ आढावा घेतला आहे.

सिंधू संस्कृती असे आपण म्हणतो तेव्हा संस्कृती हा शब्द आपण एका विशिष्ट अर्थाने वापरतो. इंग्रजीमधील 'सिव्हिलायझेशन' या शब्दाच्या जागी आपण संस्कृती हा शब्द वापरतो. 'सिव्हिलायझेशन' या इंग्रजी शब्दासाठी चपखल मराठी प्रतिशब्द नाही. आता, अगदी लहानात लहान मानवी समूह जेथे स्थिरपणे वस्ती करून राहतो आणि जेथे एक समूहजीवन आकाराला येते तेथे एक ना एक संस्कृती आकाराला येतेच. या अर्थाने सिंधू नदीच्या खोऱ्याच्या प्रदेशामध्ये खेडेगावे व स्थानिक लोकजीवन यांवर आधारित संस्कृती आकाराला आली ती थेट आजपासून ८-१० हजार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. जेथे नगरे अस्तित्वात येतात तेथे मानवी समाजाच्या वाटचालीचा एक वेगळा टप्पा गाठला जातो. नगर वा शहर हे एका मोठ्या विशाल प्रदेशाचे आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक केंद्र असते; त्याचे त्या प्रदेशात वरचढ स्थान असते. अनेक गावांना एका समाईक समाजव्यवस्थेत बांधण्याचे काम ही नगरे करीत असतात. जेथे प्रादेशिक पातळीवर अशी समाजव्यवस्था प्रस्थापित होते तिथे एक ना एका स्वरूपात राज्यसंस्था, प्रशासन, राज्यकर्ते व सामान्य प्रजाजन, संस्थात्मक धर्म, प्रादेशिक दळणवळण व व्यापार, आणि नाना जन-जमातींचे संमिश्रण असलेला बहुजिनसी समाज या गोष्टीपण आढळतात. असा समाज श्रेणीबद्ध, विषम असतो. श्रेष्ठींचा सधन, अभिजनवर्ग उत्पन्न होतो आणि त्याची जीवनशैली सामान्यजनांच्या जीवनशैलीपेक्षा ठळकपणे वेगळी आढळते.

या टप्प्यावर नागर सभ्यता व संस्कृती आकारास आली असे म्हणता येईल. 'सिव्हिलायझेशन' हा शब्द या टप्प्यावर पोचलेल्या नागर समाजांना व त्यांच्या सभ्यता व संस्कृती यांना उद्देशून वापरला जातो. ठळकपणे या टप्प्यावर अनेक गोष्टी वेगळ्या आढळतात. उदाहरणार्थ, या टप्प्यावर दगडी व हाडांच्या औजारांच्या जागी वा जोडीला धातूंची — तांबे, ब्राँझ (मिश्र धातू) — औजारे वापरात येतात. साध्या, तकलादू झोपड्यांच्या जागी माती, न भाजलेल्या वा भाजलेल्या विटा, घडीव दगड यांचा वापर करून मोठी, पक्की घरे व इतर सार्वजनिक इमारती उभारल्या जातात. काही एका प्रगल्भ कल्पना व आराखड्यांनुसार तसेच विशेषीकृत वापरासाठी बांधलेल्या इमारती आढळून येतात. बांधकामतंत्रही विकास पावते. इमारती लाकडाचा वापर आढळून येतो. अभिजन

---

* **अंडरस्टँडिंग हराप्पा : सिव्हिलायझेशन इन द ग्रेटर इंडस व्हॅली**, शिरीन रत्नागर, तुलिका, २००१, नवी दिल्ली, रु. २२०.००.

* ***दि एंड ऑफ दि ग्रेट हराप्पन ट्रॅडिशन***, मनोहर पब्लिशर्स, नवी दिल्ली, २०००, रु. ४००/- असे प्रा. रत्नागर यांचे याच विषयावरील आणखी एक पुस्तक आहे. याचा परामर्श प्रस्तुत लेखाच्या शेवटी घेतला आहे.

श्रेष्ठी वर्गाच्या वर्तुळात उच्चभ्रू, कलात्म, अभिरुचिसंपन्न जीवनशैली निर्माण होते. या वर्गासाठी खास उच्च प्रतीची, कलाकुसरीची भांडीकुंडी, वस्त्रप्रावरणे, दागिने-अलंकार, वेशभूषा व साजशृंगाराची साधने इत्यादी वस्तूंचे उत्पादन केले जाऊ लागते. विशेष कुशल व निपुण कारागीर वर्ग अस्तित्वात येतो. पौरोहित्य आवश्यक ठरावे असे सार्वजनिक धार्मिक विधी प्रस्थापित होतात. आर्थिक, व्यापारी, राजकीय केंद्रीकरणासोबत, शासन-प्रशासनासोबत वेगवेगळ्या प्रकारची लिखापढी आवश्यक बनते, नोंदी कराव्या लागतात. यामधून लिपीबद्ध लेखन ही गोष्ट आकारास येते. विशेष घटनांची नोंद लेखनाद्वारे — शिलालेख, मातीच्या 'पाट्यां' (clay tablets) वरील नोंदी इ. प्रकारांमध्ये — केली जाऊ लागते.

सिंधू नदीच्या खोऱ्याच्या प्रदेशात 'सिंधू संस्कृती' या नावाने ओळखली जाणारी नागर संस्कृती इसवीपूर्व २६००-१९०० या काळात भरभराटली. इसवीपूर्व १९०० नंतरच्या काळात तिचा ऱ्हास सुरू झाला आणि ही नागर संस्कृती लोप पावली. प्रा. रत्नागर लिहितात, "In some parts of the world the tradition of the Bronze Age endured... But not so the Harappan or the Turkmenian (Central Asian) Bronze Age tradition... The state and the organisation of the urban, overseas trading economy in the Harappan world disintegrated." (पृ. ४) असे का घडले असावे याची काही उकल करण्याचा पुढे आपण प्रयत्न करू.

तिच्या भरभराटीच्या काळात (इसवीपूर्व २६००-१९००) सिंधू संस्कृतीचा विस्तार जगातील समकालीन प्राचीन संस्कृतींमध्ये सर्वाधिक होता असे म्हटले जाते. आजच्या पाकिस्तान, भारत व अफगाणिस्थान या राष्ट्रांच्या सिंध, माक्रान, बलुचिस्थान, पंजाब, हरयाणा, उत्तर राजस्थान, काठियावाड, कच्छ आणि बदखशान (Badakhshan) प्रांतांमध्ये हराप्पा संस्कृतीची ठाणी (sites) सापडलेली आहेत.

सिंधू संस्कृती प्रथमपासून अखेरपावेतो पश्चिमाभिमुख राहिली. म्हणजे असे की, नाईल नदीकाठी भरभराटलेली ईजिप्शियन संस्कृती आणि युफ्रेटिस-टायग्रिस नद्यांच्या खोऱ्यांत भरभराटलेल्या मेसोपोटेमियन/सुमेरियन संस्कृती यांच्याशी तिचे घनिष्ठ लागेबांधे व देवाण-घेवाणीचे संबंध आढळून येतात. या तिन्ही संस्कृती जवळपास समकालीन होत्या आणि त्याच एका तंत्र-वैज्ञानिक शोधांवर भरभराटीस आलेल्या होत्या, हे सुविख्यात प्राच्य इतिहासकार गॉर्डन चाइल्ड यांचे मत उद्धृत करून रत्नागर म्हणतात, "and, as we know of interactions between the three areas in the period just before the Bronze Age, this cannot have been a coincidence." (पृ. ११)

आशिया खंडाच्या दक्षिण भागातला, आद्य नागर संस्कृतींचा प्रचंड विस्तीर्ण प्रदेश डोळ्यांसमोर आणला तर सिंधू संस्कृतीचा मध्यवर्ती प्रदेश हा, या आद्य नागर संस्कृतींच्या पूर्वेच्या सीमेवरील प्रदेश असल्याचे लक्षात येते, असे रत्नागर यांनी एके ठिकाणी म्हटले आहे. हे निरीक्षण फार महत्त्वाचे आहे. ईजिप्त, मेसोपोटेमिया व सिंधू या तीन नागर संस्कृती मिळून एक एकात्म सांस्कृतिक क्षेत्र होते हे जाणायला हवे. या तिन्ही संस्कृतींची दोन वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे सांगता येतात. एक, दूरवरच्या प्रदेशातून काही काही विशिष्ट साधने [इमारती लाकूड, बांधकामासाठी दगड, कलात्मक वस्तूंचे व विभिन्न औजारांचे उत्पादन करण्यासाठी लागणारे मूल्यवान धातू, खडे/दगड (precious stones) इत्यादी] आणण्याची व्यवस्था, आणि नद्यांवरील वा सागरी जलवाहतूक ही ती दोन मध्यवर्ती वैशिष्ट्ये.

जवळपास पाच हजार वर्षांपूर्वीच्या जगातील लोकसमूहांमध्ये दळणवळण नसेल; वस्तूंची, कल्पनांची, कारागिरी कौशल्यांची, रीतिभातींची देवाण-घेवाण होणे अशक्यप्राय असेल अशी आपली समज असते. कंदमुळे, फळे-बिया गोळा करून, लहानमोठ्या प्राण्यांची शिकार करून जेमतेम उदरनिर्वाह करणारे, वा गुराढोरांचे कळप बाळगणारे पशुपालक ('धनगर') समूह जाऊन जाऊन किती लांबपर्यंत जाणार, असे आपल्या मनात येते. वेगवेगळ्या कारणांनी, अगदी विशुद्ध शोधक जिज्ञासेपोटी वा साहसाच्या ऊर्मीमधूनही माणसे खूप दूरदूरपर्यंत गेलेली दिसतात. महासागर कसा पार करू शकणार, असे आपल्या मनात येते. पण पाचसहा हजार वर्षांपूर्वी त्यांना उपलब्ध असलेल्या संसाधनांचा उपयोग करून प्राचीनकालीन लोक नाव कशी बांधीत त्याचा चित्रांवरून अभ्यास करून त्यावरहुकूम नाव बांधून, सागरी व वाऱ्यांच्या प्रवाहांचा उपयोग करून अटलांटिक महासागर पार करून लोक गेले होते, असे अलीकडे थॉर हेयरदाल (Thor

Heyerdahl) यांच्यासारख्यांनी प्रात्यक्षिक करून दाखवून दिले आहे.+

प्रा. रत्नागर यांनी नमूद केलेले एक महत्त्वाचे वैशिष्ट्य असे की, तिच्या भरभराटीच्या काळात सिंधू नदीच्या खोऱ्यातली 'प्रौढ हराप्पा' (Mature Harappan) संस्कृती दूरवरच्या प्रदेशांमधूनच हस्तगत करता येऊ शकणाऱ्या अनेक गोष्टींवर अवलंबून होती. यांपैकी एकेका गोष्टीसाठी कोठे पोचावयास हवे ते ठिकाण पुष्कळदा वेगवेगळेच असे. यावरोवरच एक वैशिष्ट्यही ध्यानात घ्यायला हवे. कच्चा माल जर मोठ्या प्रमाणावर आयात करावा लागत असेल तर उत्पादित वस्तूंचा खप कोणामध्ये व्हायचा त्याचा काही खुलासा व्हायला हवा. याची फार अपुरी कल्पना आज आपल्याला आहे. सिंधू संस्कृतीमध्ये उत्पादन केल्या जाणाऱ्या अनेक वैशिष्ट्यपूर्ण कलात्मक वस्तू ईजिप्शियन व मेसोपोटेमियन संस्कृतींच्या क्षेत्रातल्या वस्त्यांच्या, शहरांच्या उत्खननांत सापडल्या आहेत, त्या अर्थी या प्रकारच्या उत्पादनांचा व्यापार (वा देवाण-घेवाण) सिंधू संस्कृतीच्या भरभराटीसाठी आवश्यक होता, ही गोष्ट ध्यानात येते.

प्रा. रत्नागर यांच्या लेखनामधून सिंधूच्या खोऱ्याचे एक अनपेक्षित असे वैशिष्ट्य समोर येते. या सर्व भूभागात पावसाचे प्रमाण पुष्कळ कमी आहे. निम-वाळवंटी (semi-arid) असा हा सारा प्रदेश आहे. सिंधू नदीला वरचेवर महापूर येत असले तरी, या पुराच्या दूरवर पसरणाऱ्या पाण्याच्या, व पाण्यावरोबर येणाऱ्या सुपीक गाळाच्या भरवशावर या खोऱ्यामध्ये सघन व समृद्ध शेती होत नव्हती; सिंधू नदीचे महापूर फार विध्वंसक परिणाम करणारे होते असे रत्नागर यांनी लिहिले आहे. सिंधू संस्कृतीचा उत्कर्ष व भरभराट शेतीच्या उत्पादनाच्या, शेतमालाच्या निर्यातीच्या आधारे झालेली दिसत नाही. मोहेंजोदडो व हराप्पा या दोन शहरांविषयीचे जे तपशील पुस्तकात येतात त्यांवरून जी काही राज्यसत्ता अस्तित्वात असेल ती करांच्या रूपाने शेतमाल मोठ्या प्रमाणावर गोळा करून त्याच्या विनियोगाच्या आधारे वैभवशाली बनली असेही दिसत नाही. किंवहुना, छाप अशी उमटते की, सुसंघटित स्वरूपाची राज्यसंस्थाच जागेवर नव्हती. मोहेंजोदडो व हराप्पा ही दोन नगरे ही एका स्वतंत्र व समर्थ केंद्रीय राज्यसत्तेची केंद्रे असल्याची चिन्हे उत्खननामध्ये मिळत नाहीत. याचे एक कारण असे की, या संस्कृतीविषयी उकल करून घेण्यास उपयोगी असे दीर्घ कोरीव लेख हाती आलेले नाहीत. यावावतीत ईजिप्शियन व मेसोपोटेमियन संस्कृती अत्यंत समृद्ध आहेत. सिंधू लिपीचे वाचन अद्याप करता आलेले नाही ही गोष्ट हा एक अडथळा जरूरच आहे; पण ती लिपी उलगडली तरी मोठे कोरीव लेख आजवर उजेडात आलेले नसल्याने, लिपी उलगडण्याचाही उपयोग फार मर्यादितच राहणार.

प्रा. रत्नागर यांनी (सिंधू संस्कृतीचा) 'उद्‌गम' असे एक प्रकरण लिहिले आहे. मध्य आशिया, बलुचिस्तान, अफगाणिस्थान, वायव्य सरहद्द प्रांत, पंजाब, सिंध अशा विस्तीर्ण प्रदेशातील इसवीपूर्व ८ ते ६ हजार वर्षांपासूनच्या मानवसमाजाच्या वाटचालीचा आढावा प्रा. रत्नागर यांनी घेतला आहे. दोन प्रकारचे जनसमूह डोळ्यासमोर आणावे लागतात. एक, स्थानिक परिसरातील जंगल, जमीन व पाणी या संसाधनांच्या आधारे शेती विकसित करून खेडी वसवून स्थानिक ग्रामजीवनाची उभारणी करणारा शेतकरी समाज. दुसरा, गुराढोरांचे कळप जोपासणारा, ऋतुमानाप्रमाणे गुरांना चारण्याच्या दृष्टीने योग्य त्या भागांमध्ये स्थलांतर नियमितपणे करणारा, हंगामी वस्ती करणारा भटका गुराखी, पशुपालक समाज. या दोन भिन्न समाजांची जीवनशैली वेगवेगळी व वैशिष्ट्यपूर्ण असते; त्यांचे मानस व व्यक्तिमत्त्वही ठळकपणे वेगळे घडते. पशुपालक समाजातील माणसे, पाण्याचे स्रोत व साठे, कुरणे व चारा, अन्नधान्याची विपुलता यांच्या शोधात नवनव्या प्रदेशांचा धांडोळा घेत असतात, दूरवरपर्यंत जातात. या भ्रमंतीच्या ओघात त्यांचा संबंध स्थिरपणे एका भागात राहून शेती करणाऱ्या समाजांशी येतो आणि त्यांच्यात देवाण-घेवाण होते. या देवाण-घेवाणीमधून उत्पादने, संसाधने यांचे तर अभिसरण वाढतेच, पण माहितीचीही महत्त्वपूर्ण देवाण-घेवाण होते यामुळे दोन्ही समाजांचे भौतिक, सांस्कृतिक व आत्मिक जीवन समृद्ध होते.

भारतामध्ये आजच्याही घडीला आपणांस या दोन्ही समाजांचे अस्तित्व आणि त्यांच्यामधील देवाण-घेवाण आढळते. यांची जीवनशैली तर वेगळी असतेच, पण यांच्या व्यक्तिमत्त्वांची जडण-घडणही वेगळी होत असावी ही गोष्ट स्पष्ट दिसते. व्यक्तिवादी, साहसी, स्वतंत्र बाणा जोपासणारे, चटकन

+ त्यांच्या नेतृत्वाखालील चमूने अटलांटिक महासागर पार केल्याची रोमहर्षक कहाणी 'कोन-तिकी' या जगविख्यात पुस्तकात आलेली आहे.

अनुक्रमणिका

आक्रमक पवित्रा घेणारे, धोका पत्करणारे असे व्यक्तित्व गुराखी संस्कृती जोपासते तर स्थिर शेतीधिष्ठित समाज हा समूहनिष्ठ, चाकोरी सहजी न सोडणारे, भित्रे व भीरू स्थितिवादी व्यक्तित्व जोपासतो.

पण शेतीची समृद्धी ही निर्णायक महत्त्वाची ठरते. गुराखी समाजालाही शेतीच्या समृद्धीचे व स्थिरतेचे आकर्षण असते. असो.

प्रा. रत्नागर यांनी असे म्हटले आहे की, 'आरंभकालीन हराप्पा' संस्कृतीच्या काळात शेतीचे तंत्र व पिकांचे ज्ञान प्राप्त झाल्यावर, शेतीने समृद्धी आल्यावर वस्त्यांची संख्याही वाढली, व एकंदर लोकसंख्येतही वाढ झाली. शेतकरी जीवनाच्या आधारे ज्या कारागिरी व्यवसायांची वाढ होते, जी श्रमविभागणी घडून येते त्याची चिन्हेही दिसायला लागली. स्थानिक संस्कृती जागजागी उदय पावल्या. सामाजिक संस्था, चालीरीती, वापराच्या वस्तू यांची इतर समाजांसोबत देवाण-घेवाणपण होत गेलेली आढळते.

या संपूर्ण काळात मेहरगढ (Mehrgarh) नावाचे गाव दीर्घकाळ अस्तित्वात होते. हे बलुचिस्तानचा डोंगराळ प्रदेश व सिंधमधील सिंधूच्या खोऱ्याचा मैदानी प्रदेश यांच्या सीमेवर वसलेले गाव. या दृष्टीने याची जागा मोक्याची होती. या गावात पद्धतशीरपणे अनेक थरांमध्ये उत्खनन केले गेले आहे. या गावाच्या अभ्यासाच्या आधारे उद्‌बोधक विवेचन करीत प्रा. रत्नागर यांनी संस्कृतीच्या वाटचालीचा आलेख काढला आहे.

इ.स. ३३०० नंतरच्या काळाविषयी त्या म्हणतात, "In the high altitude valleys there were by now villages of mud & mudbrick houses, occasionally on stone rubble foundation, large storage vessels, grinding stones, ground stone axes, a rich variety of flaked stone tools and clay slingstones for hunting or warfare. Stone seals came into use. The villages of this period were four times as many as in the previous period......."

"In the period 3300-2600 B.C. there were significant interactions also on the plains between the distinct cultures that had by now taken shape. The Kot Dijian, the Amrian and the Sothi-Siswal.... all portions of the greater Indus valley were now settled, from the Potwar plateau in the North to Amri in the South... By this time the subsistence base of the Indus civilization was in place. Wheat, Barley, Lentil, Peas, Sesamum, Linseed, Dates and Grapes were being cultivated. Sheep, Goat and two kinds of cattle are attested. Most important, the surface of a ploughed field was sealed under Early Indus habitation layer at Kalibangan,..... as cross furrows were visible we can infer that two crops were raised in the field which is good evidence for intensive agriculture. Early Kalibangan testifies to an appreciable utilisation of copper in the Sothi-Siswal culture,.... people of this culture probably anticipated the Harappan norm of brick production and brick laying."

प्रा. रत्नागर यांच्या लिहिण्याचा सारांश असा दिसतो की, हराप्पा आणि मोहेंजोदडो या त्याकाळच्या मोठ्या शहरांची निर्मिती होण्याआधी नागर संस्कृतीच्या उदयासाठी आवश्यक ती पार्श्वभूमी एका विस्तीर्ण प्रदेशात तयार झाली होती. पण त्यांच्याच लिहिण्यामधून हे स्पष्ट होते की, ज्याला आपण सिंधू संस्कृती असे म्हणतो त्या नागर संस्कृतीचा उत्कर्ष या विस्तीर्ण प्रदेशातील, परस्परांच्या संपर्कात असलेल्या आणि काही प्रमाणात एकमेकींशी देवाण-घेवाण करणाऱ्या स्थानिक ग्रामीण संस्कृतींमधून झाला नाही. उदाहरणार्थ, त्यांचे एक वाक्य असे आहे : "It is intriguing that Mehrgarh and Rahman Dheri, the largest and richest sites, have no subsequent Harappan occupation. It is as if the Harappan elite avoided the old centres of tribal eminence and influence, and sought to establish new seats of power. Significantly also, the uppermost stratum at Rahman Dheri, yielding shell, metal, lapis

lazuli and carnelian, dates about 2500-1900 B.C. but remains Kot Dijian in material culture." प्रा. रत्नागर यांनी असेही म्हटले आहे की, काही वस्त्यांच्या वर बाहेरून हल्ले झाले असावेत. वस्त्या जाळून टाकल्या गेल्या असाव्यात याच्याही खाणाखुणा सापडतात.

प्रा. रत्नागर यांच्या वर नोंदविलेल्या निरीक्षणांमधून असे निष्पन्न होते की, मोहेंजोदडो व हराप्पा ही दोन, त्यांच्या काळाच्या दृष्टीने असलेली महानगरे ज्या प्रदेशात स्थित होती त्या प्रदेशातील स्थानिक संस्कृतींपासून ती तुटलेली होती. या महानगरांच्या नागर संस्कृतीची ठाणी/केंद्रे असलेल्या लहान-मोठ्या आकाराच्या वस्त्या अस्तित्वात आल्या, भरभराटल्या पण त्याही एतद्देशीय संस्कृती/व्यवस्था यांचा भाग नव्हत्या.

हराप्पा संस्कृतीची विभागणी 'आरंभकालीन' ('अर्ली') आणि 'प्रौढ' ('मॅच्युअर') अशा दोन कालखंडांमध्ये करण्याचा शिष्टमान्य प्रघात आहे. यानेच तर फसणूक होत नाही ना, असा प्रश्न पडतो. त्या भूभागातील एतद्देशीय ग्रामीण स्थानिक संस्कृतींचा जो एक गोतावळा तयार होता त्या गोतावळ्यात, 'आरंभकालीन हराप्पा' संस्कृतीची भर पडली असावी; तिचे या भूभागातल्या समकालीन अन्य ग्रामीण-प्रादेशिक भगिनी-संस्कृतींशी जैव स्वरूपाचे देवाणी-घेवाणीचे संबंध होते असे दिसते. या काळी मोहेंजदडो व हराप्पा ही महानगरे अस्तित्वात नसावीत. मोठ्या नगरांच्या स्वरूपातील मोहेंजोदडो व हराप्पा यांची उभारणी विशिष्ट उद्देश व प्रयोजन डोळ्यासमोर ठेवून आराखड्यानुसार बाहेरून आलेल्या श्रेष्ठी मंडळींनी केली असे दिसते — जसे एकेकाळी भिलई हे पोलादकारखान्या-भोवती उभारले गेले. त्यांचा सभोवतालच्या लोकांशी वा संस्कृतीशी संबंध जैव स्वरूपाचा नाही तर उपरा होता.

'आरंभकालीन' व 'प्रौढ' या दोन कालखंडांमधील काळात या सर्व भूभागांत नव्या लोकसमूहांचा व (त्यांच्या भाषा व संस्कृतींचा) उदय-उत्कर्ष, या प्रदेशात त्यांचे स्थलांतर, स्थानिक रहिवाशी समुदायांशी/गावांशी कलह अशा महत्त्वपूर्ण घडामोडी झालेल्या असाव्यात. प्रा. रत्नागर असेही नमूद करतात की, या भूभागातील पश्चिम व वायव्येकडील पर्वतमय प्रदेशांमधून सिंधू नदीच्या खोऱ्यातील मैदानी प्रदेशात - सिंध व उत्तर पंजाबमध्ये — उतरण्याचे मार्ग या दोन कालखंडांमध्ये वेगळे असल्याचे आढळते. जुने, 'पायाखालचे' मार्ग बाद का ठरले? नव्या वांशिक-सांस्कृतिक लोकसमूहांचे वळण अगदी वेगळे असल्यामुळे, त्यांचे संबंधही वेगळ्या लोकांशी असल्यामुळे असे झाले असेल का? हा प्रश्न उपस्थित होतो.

प्रा. रत्नागर यांनी ठिकठिकाणी जी निरीक्षणे नोंदविली आहेत, व जो एक प्रकारे पुरावाच म्हणता येतो तो सलगपणे येथे सादर करणे उपयोगाचे होईल. त्यांच्या मते "The late Kot Dijian village Gumla with the odd Harappan weight and etched carnelian bead is overlain by a mass of burnt material and smashed walls and pottery. At Kot Diji too it appears that the Early Harappan settlement was burnt down." पुढे त्या असे लिहितात, 'This means that none of the earlier cultures was transformed into the Mature Harappan Culture. The same, incidentally, can be said of local village cultures in Gujarat which may pre-date the flowering of the Harappan culture."

सिंधू नदीच्या खोऱ्याचा जो मैदानी प्रदेश आहे त्याच्या एका भागाला Hakra plain असे नाव आहे. या प्रदेशात 'आरंभकालीन हराप्पा' संस्कृतीची अनेक ठाणी आढळतात. पण यांपैकी फक्त तीन ठाणी 'प्रौढ हराप्पा' (Mature Harappan) कालखंडात चालू राहिलेली आढळतात. 'प्रौढ हराप्पा' काळात नव्या ८३ वस्त्या आढळतात, आणि या प्रदेशात अधिक दाट लोकवस्ती राहात होती असेही आढळते. पण 'आरंभकालीन हराप्पा' संस्कृतीतील वस्त्या आणि या 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीतील वस्त्या यांचा काही अनुबंध आढळत नाही असे सूचन प्रा. रत्नागर यांच्या लेखनात आहे. त्यातून पुढील निष्कर्षाप्रत येण्यास अवसर आहे.

(१) आजचा अफगाणिस्थान, बलुचिस्थान, वायव्य सरहद्द प्रांत, तुर्कमेनिया हा मध्य आशियाचा भाग आणि सिंधू नदीच्या खोऱ्याचा मैदानी प्रदेश — पंजाब व सिंध प्रांतांमध्ये विभागलेला — या विस्तीर्ण भूभागात राहणाऱ्या लोकसमूहांच्यात आपापसात घनिष्ठ स्वरूपाचे नियमित दळण-वळण होते, देवाण-घेवाण होती. या अर्थाने हा एकात्म प्रदेश होता असे म्हणता येईल.

अनुक्रमणिका

(२) या संपूर्ण भूभागामध्ये एकजिनसी एकच एक संस्कृती आकाराला आली असे मात्र नाही. अनेक स्थानिक ग्रामीण संस्कृती उत्कर्ष पावल्या. त्यांपैकी कोणतीही एक इतरांपेक्षा वरचढ ठरली, तिचे प्रभुत्व प्रस्थापित झाले असे घडले नाही.

(३) या कालखंडात — म्हणजे 'आरंभकालीन हराप्पा' या टप्प्यापर्यंतचा कालखंड — या संपूर्ण भूभागात एकही केंद्रीभूत राज्यसत्ता उत्कर्ष पावली नाही. एकही नागर सत्ताकेंद्र अस्तित्वात आल्याचे आढळत नाही.

(४) हराप्पा व मोहेंजदडो ही दोन मोठी नागर केंद्रे प्रस्थापित झाली त्यानंतरच्या टप्प्याला उद्देशून 'प्रौढ हराप्पा' (Mature Harappan) असे म्हटले जाते. पण 'आरंभ-कालीन हराप्पा' संस्कृती आणि 'प्रौढ हराप्पा' संस्कृती या वस्तुतः वेगळ्या जातकुळीच्या संस्कृती होत्या. आरंभकालीन हराप्पा संस्कृती ही ग्रामीण तर 'प्रौढ हराप्पा' संस्कृती ही नागर संस्कृती होती.

(५) 'आरंभकालीन हराप्पा' संस्कृती तिच्या समकालीन इतर स्थानिक संस्कृती यांच्यापैकी एक असूनही एका आंतरिक विकासप्रक्रियेच्या आधारे मोहेंजदडो-हराप्पा या दोन नगरांवर अधिष्ठित नागर संस्कृतीमध्ये उत्कर्ष पावली नाही. या नागर संस्कृतीचा या भूभागातल्या आधीपासून अस्तित्वात असलेल्या स्थानिक ग्रामीण संस्कृतींशी जैव स्वरूपाचा आत्मीय संबंध असल्याचे आढळत नाही. मेसोपोटेमिय नागर संस्कृती ही *दर्यावर्दी* संस्कृती होती. व्यापारी देवाणघेवाणही बरीच असे. तेव्हा अशी कल्पना करता येते की, त्या संस्कृतीतले साहसी उद्योजक त्यांना लागणाऱ्या कच्चामालाच्या शोधात-सिंधू नदीच्या खोऱ्यात येऊन पोचले. त्यांना येथे कच्चा मालही मिळाला व कारागिरी कौशल्य असलेली मंडळीही भेटली व काही पक्का मालही, ज्या वस्तू विशेष आकर्षक त्यांना वाटल्या. त्यामुळे त्यांनी येथे ठाणी प्रस्थापित केली. यामधून 'आरंभकालीन हराप्पा' संस्कृती येथील एतद्देशीय संस्कृतींच्या गोतावळ्याची एक घटक बनली.

(६) आधीपासून अस्तित्वात असलेल्या बऱ्यापैकी प्राचीन स्थानिक संस्कृतींच्या मध्ये प्रस्थापित झालेली, पण वस्तुतः परकी व उपरी अशी 'प्रौढ हराप्पा' ही नागर संस्कृती होती. तिचे वळण सर्वस्वी वेगळे होते. तिचे ऋणानुबंध वेगळ्याच लोकसमूहांशी व संस्कृतींशी होते. मेसोपोटेमियन संस्कृतींशी 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीचा घनिष्ठ संबंध आढळून येतो.

(७) प्रा. रत्नागर यांनी असे म्हटले आहे की, "It is not impossible that there was a political reason why Mature Harappan settlements did not proliferate in the plains of northern Punjab." त्यांनी असेही नमूद केले आहे की, उत्तर व मध्य बलुचिस्तान-मधील वस्त्यांचाही 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीशी संपर्क तुटला. त्या लिहितात, "It is as if a frontier was closed."

याचे एक कारण, मध्य व उत्तर बलुचिस्तान आणि उत्तर पंजाबमध्ये वेगळी भाषा व संस्कृती विकसित करणाऱ्या लोकसमूहांचे वर्चस्व प्रस्थापित होत होते. 'आरंभकालीन हराप्पा' संस्कृतीच्या प्रभाव व संपर्क क्षेत्रातील गावांमध्ये जाळपोळ, विध्वंस यांचा पुरावा सापडतो. यांचाही संबंध वेगळ्या सांस्कृतिक-वांशिक लोकसमूहांचे वर्चस्व या भागात नव्याने प्रस्थापित होण्याशी होता असे म्हणता येते.

(८) 'प्रौढ हराप्पा' संस्कृती ही अगदी स्पष्टपणे नागर होती. तिचे वळण व्यापारी होते. प्रा. रत्नागर यांचे पुढील विधान अर्थपूर्ण आहे : "It was only in the latter period (i.e. Mature Harappan) that there appeared city life, writing, a uniform weighing system, regional specialisation in crafts, industrial sites and maritime ventures to the Gulf and Mesopotamia."

(९) 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीचा संपर्क दूरवरच्या प्रगल्भ संस्कृतींशी, थेट दक्षिण मेसोपोटेमियाशी होता. सामुद्रिक दळणवळणाच्या आधारे हा संबंध होता. म्हणजे गलबते बांधणे, त्यांचा वापर करून सागरी प्रवास करणे ही कौशल्ये या संस्कृतीच्या अस्तित्वासाठी वा भरभराटीसाठी अत्यावश्यक होती. तत्कालीन गुजरात, काठियावाड, कच्छ या प्रदेशातील सागरी किनारपट्टीवर आजपर्यंत तरी या कौशल्यांचा आढळ होणाऱ्या स्थानिक संस्कृती आढळून आलेल्या नाहीत. प्रा. रत्नागर मग प्रश्न उपस्थित करतात : "From where, then, did the Harappan culture-complex derive its boatbuilding technology and its skills and traditions of sailing, navigation and land-sighting?"

मेसोपोटेमियात बऱ्याच आधीच्या काळापासून प्रगल्भ, नागरी संस्कृती उत्कर्ष पावलेली होती. मध्यवर्ती सत्ताकेंद्र

म्हणता येईल अशी नगरे, राज्यसत्ता, धर्मपीठ, विस्तारवादी धोरणे वगैरे वैशिष्ट्यपूर्ण संस्था व गोष्टी यांचा आढळ तेथे होतो. विवक्षित कच्च्या मालासाठी दूरवर पोचण्याची, व आवश्यक तो कच्चा माल आणविण्याची व्यवस्था व क्षमता आढळते. गलबतांच्या शिडांची बांधणी करण्याची कला जाणणारी मंडळी या संस्कृतीत होती. व्यापारीवर्गही होता. सागरी वाहतूक व व्यापार हे या संस्कृतीचे वैशिष्ट्य होते. खुष्कीच्या मार्गानेही दूरवरपर्यंत लोक पोचत होते. अरबी समुद्र असे आपण भारताच्या पश्चिमेकडील समुद्राला म्हणत आलो आहोत. या सर्व किनारपट्टीवर व समुद्रावर प्राचीन काळापासून दर्यावर्दी अरब मंडळींचे वर्चस्व राहिले. आधुनिक युगाच्या आरंभीच काय ते पोर्तुगीजांनी यांचे वर्चस्व मोडून काढले.

मेसोपोटेमियातील तत्कालीन वैभवशाली, विस्तारवादी संस्कृतीला, सिंधू नदीच्या खोऱ्याच्या मैदानी प्रदेशामधून काही विवक्षित संसाधने मुबलक प्रमाणात प्राप्त होण्याच्या शक्यता लक्षात आल्या असाव्यात. पंधराव्या शतकानंतर युरोपीय व्यापारी मंडळ्या आशियाच्या वेगवेगळ्या भागांमध्ये त्यांना हवा असलेला माल संपादित करण्याच्या उद्देशाने आल्या, त्यांनी 'वखारी' स्थापित केल्या, जरूर तेथे बंदरांचाही विकास केला, नगरे वसविली. या शहरांमध्ये त्यांनी वस्ती केली, प्रशासनव्यवस्था उभारली, त्यांचे वैशिष्ट्यपूर्ण सांस्कृतिक, धार्मिक व सामाजिक जीवनही या नगरांमध्ये बहरले. पण या नगरांच्या व सभोवतालच्या स्थानिक नागर/ग्रामीण संस्कृतींशी, लोकांशी घनिष्ठ, जैव संबंध प्रस्थापित झाला नाही. ती परक्या संस्कृतीची ठाणी म्हणूनच शेवटपर्यंत राहिली.

इंग्लिश ईस्ट इंडिया कंपनीचे वेगळेपण यात होते की अठराव्या शतकाच्या मध्यानंतर या उपखंडाच्या विस्तीर्ण भूभागांवर त्यांचे राज्य प्रस्थापित होत गेले. इंग्रजांच्या ईस्ट इंडिया कंपनीने येथे स्वतःची व्यापारी-आर्थिक उद्दिष्टे साध्य करण्याच्या हेतूने व त्या ओघात येथे दीड-पावणेदोनशे वर्षे राज्य केले. तरी मागे वळून पाहता ते येथे उपरेच राहिले, त्यांची संस्कृती परकीच राहिली, असे लक्षात येते. येथे राज्य करणे, आपली राजवट टिकवून आपले, मुख्यत्वेकरून, आर्थिक व भू-राजनैतिक ('जिओपोलिटिकल') हितसंबंध साध्य करणे अशक्यप्राय आहे हे अनुभवल्याने, स्वतःच्या भूमीमध्ये त्यांचा मोठ्या प्रमाणावर शक्तिपात झाल्याकारणाने, त्यांनी येथील गाशा गुंडाळला.

जिला आपण 'सिंधू संस्कृती' म्हणतो तिचा त्या प्राचीन काळी हाच आकृतिबंध राहिला. प्रा. रत्नागर यांच्या निरीक्षणांचा/पुराव्यांचा एकत्रितपणे व सामग्र्याने विचार करता हा निष्कर्ष अटळपणे हाती येतो.

हराप्पा संस्कृतीच्या ऱ्हासाला उद्देशून 'civilisational collapse' हा शब्दप्रयोग प्रा. रत्नागर यांनी एकाहून अधिक वेळा वापरला आहे. त्यांनी नोंदविलेल्या काही घडामोडी अशा : "the large-scale abandonment of Harappan cities, craft towns, garrisons and villages. Mohenjo-daro was abandond... Ganweriwala, Dholavira and Rakhi Garhi, the other large settlements, were deserted."

वैभव व सत्ता या दृष्टीने मूळ व मुख्य केंद्र असलेली मेसोपोटेमियन संस्कृती इसवीपूर्व १९००-१८०० या सुमारास वेगवेगळ्या आघातांनी जर्जर, दुबळी व उभारी गमावलेली अशी झाली असे प्रा. रत्नागर यांच्या पुढील विवेचनावरून स्पष्ट होते: "In southern Mesopotamia there had been an agricultural decline due to shifts of the Euphrates, and soil salinity.. total settled area shrank appreciably in the south and the political centre of gravity moved northward.... the culture of Bahrain saw an eclipse in the second millenium. An important trade circuit, a source of wealth to the Harappan elite, had thus dwindled...."

"The end of this external trade can have serious consequences for an economy if that economy has been structured around trade. We could suggest that an economic structure was dependent on foreign trade if there was expansion of settlement to or colonisation of mineral resource areas, the establishment of sea-ports, the institution of ancillary activities like forestry & shipbuilding, the deployment of labour for the manufacture of craft items for export and so on. The end of trade

could mean the disintegration of such institutions so that the population could relocate over the land, with changed economic imperatives/goals. Reversion to individual households engaged in subsistence agriculture and/or pastoralism is a likely consequence."

सिंधू संस्कृती हा एक प्रकारे सुमेरियन संस्कृतीच्या गरजेपोटी तिचा केलेला वेगळ्या प्रदेशातील विस्तार होता. ज्या प्रदेशात त्या संस्कृतीने आपली ठाणी वसवली त्या प्रदेशातील संसाधनांचा उपयोग करून स्थानिक कारागिरांच्या मदतीने निर्यातीसाठी कलात्मक वा उपयोगी वस्तूंचे उत्पादन करण्याची केंद्रे या ठाण्यांमध्ये प्रस्थापित केली असल्यास ती गोष्ट स्वाभाविक ठरते. काही प्रकारचा माल हा प्रक्रिया न करतादेखील मेसोपोटेमियाला वा अन्य ठिकाणी निर्यात केला जात असावा. हराप्पा संस्कृतीच्या प्रौढ कालखंडात ज्या वेगवेगळ्या वस्त्या आढळतात त्या वस्त्यांचे प्रयोजन पुष्कळदा अगदी विशिष्ट उद्देशाच्या पूर्ततेचे होते असे लक्षात येते. तसेच मोहेंजोदडो आणि हराप्पा या नगरांमध्ये कारागिरांच्या खास वस्त्या होत्या आणि जणू कारखान्यात उत्पादन व्हावे अशा पद्धतीने त्यांचे उत्पादन चालत होते असे आढळून आलेले आहे ही गोष्ट या संदर्भात बोलकी वाटते.

'प्रौढ हराप्पा' संस्कृतीतील सर्वोच्च सत्ताधारीवर्ग हा अंशतः तरी परकीय राहिला असण्याची खूपच शक्यता दिसते. ब्रिटिश राजवटीच्या काळात ब्रिटिश अधिकाऱ्यांची वस्ती ही ठळकपणे स्थानिक वस्तीहून दूर आणि पूर्णपणे आखीवरेखीव असे. बंगले प्रशस्त असत, त्यांना आवार असे. थोडक्यात, 'सिव्हिल लाईन्स'चा भाग हा उच्च आणि गाव हे कनिष्ठ स्तरावर आहे हे ठसवले जाई. त्याच प्रकारची रचना 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीमध्येही होती ही गोष्ट बोलकी आहे. निर्यात व्यापाराभोवती या संस्कृतीची उभारणी मुख्यत्वेकरून झालेली असल्याकारणाने, आणि स्थानिक व्यक्तींनी कर्तृत्वाने एका संस्कृतीची उभारणी केली आणि राज्य स्थापले अशी गोष्ट घडलेली नसल्याने, शिलालेखांच्या स्वरूपातले लेखन अत्यावश्यक ठरले नसले तर नवल नाही. त्यामुळे 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीमध्ये जरी लिपीचा आढळ झाला तरी भाषा व लेखन यांचा विकास शून्यवत आढळतो याचे नवल वाटू नये. लोकमान्य टिळकांनी ब्रिटिश राजवटीतील सर्वोच्च ब्रिटिश अंमलदारांना उद्देशून, हे साम्राज्यसत्तेचे स्थानिक 'कोठावळे' आहेत असे म्हटले होते. 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीतही जे सर्वोच्च अंमलदार असतील, तेही परकीय वा परकीय व्यापाऱ्यांचे एजंट राहिले असावेत.

त्यामुळे जेव्हा मेसोपोटेमियामधली स्थिती बिघडली त्या वेळेला निर्यात एकाएकी झपाट्याने घटत गेली असेल. निर्यात नाही म्हटल्यावर मालाचे उत्पादन करीत राहणे व्यर्थ ठरले असणार. अशा परिस्थितीत सिंधूच्या खोऱ्यात वस्ती करून राहण्याचे कारण उरले नाही. त्यामुळे सत्ताधारी मंडळी मोठ्या प्रमाणावर मेसोपोटेमिया वा त्यांच्या मूळ भूमीकडे परत गेली असतील असा तर्क करता येतो. जसे १९४७ साली ब्रिटिश मोठ्या संख्येने मायदेशी परतले. फरक एवढाच की, हराप्पा संस्कृती ही प्रथमपासून शेवटपर्यंत उपरीच राहिली असल्यामुळे सत्ताधारी मंडळी निघून गेल्यावर अर्थोत्पादनाच्या दृष्टीने ती एकदम ठप्प झाली आणि संस्कृतीही पाहता पाहता कोसळली. 'सिव्हिलायझेशनल कोलॅप्स' हे प्रा. रत्नागर यांनी वापरलेले शब्द अगदी चपखलपणे लागू पडतात.

'प्रौढ हराप्पा' संस्कृतीने पाय काढता घेतल्यावर येथे कोणती परिस्थिती उद्भवली? आपण असे पाहिले की, येथे प्राचीन काळापासून अनेक स्थानिक ग्रामीण संस्कृती भरभराटल्या. त्यांच्यात परस्परसंपर्क व देवाण-घेवाण होती. याचा अर्थ असा की, 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीचा उत्कर्ष येथे झाला त्या वेळी उत्तर व पश्चिम भारतात लहान-मोठी गावे स्थिर स्वरूपात अस्तित्वात होती आणि त्यांना सांस्कृतिक परंपराही होती. 'प्रौढ हराप्पा' संस्कृती लोप पावल्याने या प्रादेशिक ग्रामीण संस्कृतींवरील एक परकीय प्रभाव संपुष्टात आला.

'प्रौढ हराप्पा' संस्कृती ही परकीय बाजारपेठांसाठी माल तयार करणारी व निर्यात व्यापारावर अवलंबून असणारी संस्कृती होती. तिने सिंधूच्या खोऱ्यातील काही संसाधनांचे अतिरेकी दोहनपण केले असले पाहिजे. ग्रामीण संस्कृतीच्या तुलनेने नागर संस्कृती, व त्यातही श्रेष्ठी वर्गाचे चंगळवादी जीवनमान, ही पुष्कळ अधिक संसाधने दरडोई वापरते ही परिचित गोष्ट आहे. भाजलेल्या विटांची मोठी बांधकामे, नगराभोवती विटांच्या भिंतींची तटबंदी हे हराप्पा संस्कृतीचे एक वैशिष्ट्य. यासाठी जंगलाची तोड प्रचंड प्रमाणावर झाली असली पाहिजे. तांबे या धातूचा वापर ब्राँझ युगात


अनुक्रमणिका

विशेष अधिक होता. राजस्थानमध्ये तांब्याच्या खाणी होत्या याच्या खुणा आढळतात. प्रा. रत्नागर यांनी लिहिले आहे : "Local deforestation in the copper-smelting regions is also a factor we may consider. Copper technology is hugely wasteful of wood (charcoal)." मुद्दा असा की, हराप्पा संस्कृती लोप पावली तेव्हा तिचे प्रभावक्षेत्र हे संसाधनांच्या दृष्टीने अधिक दरिद्री बनलेले असणार. या कारणाने काही काळ पीछेहाटही झाली असेल. जनजीवन तर चालूच राहिले पण त्याची पातळी काहीशी गरिबीची, निकृष्ट राहिली असेल.

प्रा. रत्नागर यांनी आपल्या पुस्तकाच्या अखेरीस हराप्पा संस्कृती आर्यांच्या आक्रमणाने नष्ट झाली असण्याची शक्यता कितपत या मुद्याचा विचार केला आहे. इसवीपूर्व तिसरे सहस्रक हे युरोप खंडातील दक्षिणेकडील कुरणांचा विस्तीर्ण प्रदेश आणि मध्य आशियाचा प्रदेश यामध्ये बऱ्याच घडामोडी, उलथापालथी झाल्याचा काळ आहे. या घडामोडींचा एक परिणाम म्हणून या भागातल्या लोकसमूहांनी वेगवेगळ्या दिशांनी स्थलांतर केले व नवीन प्रदेशांमध्ये आपले प्रभुत्व प्रस्थापित करीत त्यांनी वस्ती केली असे सामान्यतः म्हणता येते. प्रा. रत्नागर लिहितात, "There is evidence for movements out of central Asia, the homeland of the Indo-Europeans and their Indo-Iranian branch after about 2000 B.C. In southern Baluchistan we find new kinds of pottery, seals and burial practices which also point to new-comers.... therefore, the widespread abandonment of sites in Turkmenia and the Gurgan valley and of Tepe Hissar to which we have referred does suggest out-migration from the steppe."

'प्रौढ हराप्पा' संस्कृती लोप पावत असल्याच्या काळात तिच्या विस्तीर्ण प्रभावक्षेत्रात, अशा प्रकारे, अस्थिरता पुष्कळच वाढलेली असली पाहिजे. स्थलांतरे घडत होती; नवे लोक या सर्व भूभागामध्ये येऊन वस्ती करू लागले होते. यामुळे लहान-मोठे कलहदेखील घडले असणार. जुन्या वस्त्यांवर हल्ले, त्यांची लुटालूट, विध्वंस या गोष्टीही घडणे स्वाभाविक होते. मोहेंजोदडो, हराप्पा आणि 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीतील अन्य ठाणी हीदेखील स्थलांतर करणाऱ्या आक्रमक टोळ्यांच्या हल्ल्यांची शिकार झाली असल्यास नवल नाही; कारण अतंर्गत कारणांमुळे 'प्रौढ हराप्पा' संस्कृती दुबळी झालेलीच होती आणि तिने काढता पाय घेतलेला होता हे आपण पाहिले.

हे जे नवे लोक या सर्व भूभागामध्ये आपली संस्कृती व भाषा घेऊन आले आणि त्यांनी आपला येथे जम बसवला ते लोक ज्यांना आपण वैदिक आर्य असे म्हणतो ते होते का, या प्रश्नाचे उत्तर निर्विवादपणे होकारार्थी देता येत नाही असे प्रा. रत्नागर यांचे म्हणणे आहे आणि ते रास्त आहे.

या ठिकाणी थोडी कल्पना लढविणे शक्य आहे आणि तसे करणे उपयोगाचेपण ठरेल. म्हणजे असे की, 'प्रौढ हराप्पा' संस्कृती लोप पावल्यामुळे या सर्व भूभागामध्ये, विशेषतः सिंधू नदीच्या खोऱ्याच्या प्रदेशात, अव्यवस्था उत्पन्न झाली तसेच एक पोकळीपण निर्माण झाली. 'निसर्गाला पोकळीची घृणा आहे' अशा आशयाची एक इंग्रजी म्हण आहे. एका बाजूने मध्य आशियामधून स्थलांतर केलेल्या, स्वतःची वैशिष्ट्यपूर्ण संस्कृती व भाषा असलेल्या समूहाने ही पोकळी भरून काढत आपले बस्तान बसवले, हे आपण प्रा. रत्नागर यांच्या विवेचनाच्या आधारे म्हणू शकतो. पण सिंधू नदीच्या खोऱ्याच्या उत्तरेकडील आणि पूर्वेकडील 'भारतीय उपखंडा'तील* प्रदेशांतही त्या काळी वैशिष्ट्यपूर्ण प्रादेशिक ग्रामीण संस्कृती असलेले प्रादेशिक जनसमूह होतेच. विशेषतः हिमालय पर्वतराजींच्या पायथ्याच्या डोंगराळ प्रदेशांमध्ये राहणाऱ्या अनेक जनसमूहांचा संपर्क वेगवेगळ्या कारणाने 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीशी येत असे ही गोष्ट जर खरी असेल, तर यापैकी काही जनसमूहांनी उत्तर व पूर्वेकडून स्थलांतर करून पोकळी भरून काढण्याची गोष्ट केली असेल अशी कल्पना करता येते. दक्षिण-युरोप खंडातील विस्तीर्ण गवताळ प्रदेश आणि मध्य आशियातील प्रदेश या भूभागातील घडामोडींचा जसा सघन अभ्यास झाला आहे तशा प्रकारचा अभ्यास भारतीय उपखंडातील विभिन्न प्रदेशांचा, हिमालयाच्या पायथ्याच्या

* साडेतीन हजार वर्षांपूर्वी 'भारतीय उपखंड' या नावाने प्रदेशाचे नामकरण झालेले नव्हते; त्या काळी राजकीय सरहद्दीही अस्तित्वात नव्हत्या. सरहद्दींचे भान असलेल्या राज्यसत्तांची निर्मिती ही पुढच्या काळातली गोष्ट आहे, हे ध्यानात ठेवायला हवे.

डोंगराळ भागाचा झालेला नाही. इसवीपूर्व तिसऱ्या-दुसऱ्या सहस्रकामध्ये भारतीय उपखंडामध्येही वेगवेगळ्या कारणांनी जनसमूहांची स्थलांतरे घडून आली असतील ही गोष्ट अगदी शक्य आहे. केवळ युरोप व मध्य आशिया भागातच अशा घडामोडी घडत होत्या असे मानणे योग्य होणार नाही. दुर्दैवाने, या सगळ्या विषयामध्ये आमची स्वतंत्र बुद्धी अजूनही आम्ही चालवत नाही असे म्हणावे लागते. अलीकडे श्री. श्रीकांत तलगेरी यांनी वैदिक आर्य हे बाहेरून आलेले लोक नव्हेत, ते येथीलच लोक होते, असा सिद्धान्त मांडून त्याच्या समर्थनार्थ पुराणे व ऋग्वेद यांच्या अभ्यासावर आधारित विस्तृत प्रतिपादन केलेले आहे. त्यांचे युक्तिवाद व त्यांचे निष्कर्ष जसेच्या तसे स्वीकारार्ह नसले तरी त्यांचे प्रतिपादन गंभीरपणे विचारात घ्यायला हवे असे आहे.

*वैदिक आर्य* ही अस्मिता किंवा स्वत:विषयी या प्रकारचे आत्मभान हे ज्या लोकसमूहाला प्राप्त झाले त्या लोकसमूहाचे घटक (कंपोनंट्स) व त्या लोकसमूहाची बांधणी (कॉंपोझिशन) हे मुद्दे शिल्लक राहतातच. पण त्या लोकसमूहाला तो भारतीय उपखंडात स्थिर झाल्यानंतरच्या काळात हे आत्मभान प्राप्त झाले आणि ही अस्मिता साकारली असे तर स्पष्ट दिसते. याचा अर्थ असा होतो की, ज्या वेळेला 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीचा लोप होण्याची प्रक्रिया गतिमान झाली त्या काळात ज्या लोकसमूहाने कालांतराने येथे वैदिक संस्कृतीचा पाया घातला त्या लोकसमूहाची लहान-मोठी राज्ये भारतीय उपखंडाच्या उत्तर भागात स्थिरावत होती आणि ऱ्हास पावत असलेल्या 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीशी व तीमधील लोकांशी यांचा संपर्क आलेला होता हे शक्य आहे. हे वेगळे लोक आहेत, यांची भाषा वेगळी आहे, हे परके आहेत अशा प्रकारची धारणा वेदांमध्ये आणि वेदकालीन साहित्यात प्रकट झालेली दिसते; सिंधू संस्कृती ('प्रौढ हराप्पा' संस्कृती) ही आपली प्राचीनकालीन संस्कृती होती अशा प्रकारची सामूहिक स्मृती (collective memory) येथील प्राचीन साहित्यातही आढळत नाही आणि सामाजिक परंपरेतही आढळत नाही हे श्री. तलगेरींचे म्हणणे यथार्थ आहे. तात्पर्य असे की, 'प्रौढ हराप्पा' संस्कृती अंतर्गत घडामोडींमुळे व कारणांमुळे ऱ्हास पावली व येथून लुप्त झाली. वैदिक आर्यांच्या आक्रमणाने ती नष्ट झाली याला कोणताही सबळ पुरावा नाही. प्रा. रत्नागर यांचा अभिप्रायही असा आहे व तो योग्य आहे. असे दिसते की, 'प्रौढ हराप्पा' संस्कृतीच्या ऱ्हासकाळी, आणि ती भारतीय उपखंडातून लुप्त होण्यापूर्वीच्या काळात, पंजाब आणि त्याच्या आसमंतातील प्रदेशात स्वत:च्या वैशिष्ट्यपूर्ण संस्कृतीचे भान असणारा, स्वत:स आर्य म्हणवणारा, वेदांची रचना करणारा असा समाज स्थिरावलेला होता. त्याने आपले सांस्कृतिक, सामाजिक, राजकीय व आर्थिक प्रभुत्व पुरेसे प्रस्थापित केले होते. या अर्थाने 'प्रौढ हराप्पा' संस्कृती (तिच्या ऱ्हासकाळात) आणि उत्कर्ष पावत चाललेली आद्य वैदिक संस्कृती या समकालीन संस्कृती होत्या असे म्हणावयास पुष्कळच जागा दिसते. याचा अधिक शोध घेण्याची अर्थातच गरज आहे. प्रा. शिरीन रत्नागर यांची विवेकशीलता त्यांच्या पुढील मार्मिक निरीक्षणा-मधून प्रकट होते. "आर्किऑलॉजी या शास्त्राच्या आधारे जी उत्खनने केली जातात आणि ज्या प्रकारच्या भौतिक वस्तुरूप गोष्टी हाती लागतात, केवळ त्यांच्या आधारे अनेक प्रश्नांची सोडवणूक होऊ शकत नाही; उत्खननांमधून हाती येणारे पुरावे आणि त्या पुराव्यांच्या आधारे काढता येणारे सुसंवादी निष्कर्ष आणि अन्य प्रकारच्या साधनांच्या व अभ्यासाच्या आधारे सूचित होणारे निष्कर्ष हे एकमेकांस छेद देणारे नाहीत एवढे जरी प्रस्थापित झाले तरी त्याने समाधान व्हायला हवे आहे."

प्राचीन भारतीय संस्कृती व इतिहास या विषयात रस असणाऱ्या सर्वांनी त्यांचे पुस्तक अवश्य अभ्यासायला हवे. हे पुस्तक त्यांनी अशा आस्थेवाईक, सर्वसामान्य जिज्ञासू वाचकांसाठीच लिहिले आहे ही त्या पुस्तकाच्या बाबतीतली एक मोठी जमेची बाजू आहे.

**प्रगल्भ, नागर हराप्पा संस्कृती 'संपूर्ण कोसळण्या'ची कारणे**

वरील परीक्षण-लेख पूर्ण केल्यावर प्रा. रत्नागर यांचे *दि एन्ड ऑफ दि ग्रेट हराप्पन ट्रॅडिशन* हे पुस्तक हाती आले. मुंबई येथील हेरास इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन हिस्टरी अँड कल्चर या संस्थेतर्फे १९९८ साली दिलेल्या हेरास स्मृति व्याख्यानांवर हे पुस्तक आधारलेले आहे.

'ग्रेट हराप्पन ट्रॅडिशन' असे हराप्पा संस्कृतीला उद्देशून म्हणता येईल का, असाच खरे तर प्रश्न पडतो. हराप्पा संस्कृतीचा क्षेत्रविस्तार, तिच्या 'प्रौढ हराप्पा' या टप्प्यावर फार मोठा होता ही गोष्ट खरी. पण याचा खरा अर्थ

मुख्यत्वेकरून हा की, हराप्पा संस्कृतीत ज्या मालाचे उत्पादन केले जात होते त्या मालाचे उत्पादन करणारी, त्यासाठी लागणारा कच्चा माल पुरविणारी, त्यांची निर्यात करणारी ठाणी विस्तीर्ण प्रदेशावर विखुरलेली होती. 'थोर हराप्पा सांस्कृतिक परंपरा' म्हटले तर कोणती याचे समाधानकारक उत्तर प्रा. रत्नागर यांच्या पुस्तकात मिळत नाही. या प्रदेशातील नाना विभिन्न जनसमूहांना एका एकात्म सर्वस्पर्शी संस्कृतीमध्ये बांधण्यात हराप्पा-मोहेंजोदडो महानगरांमधील अभिजनांना रस होता अशीही छाप उमटत नाही.

'प्रास्ताविका'मध्ये प्रा. रत्नागर म्हणतात की, महानद्यांच्या खोऱ्यांमध्ये उत्कर्ष पावलेल्या इसवीपूर्व तिसऱ्या सहस्रकातील ब्राँझयुग संस्कृतींमध्ये हराप्पा संस्कृती वैशिष्ट्यपूर्ण होती. त्या पुढे लिहितात, "The great Harappan cities may not have been as large as the primate cities on the Euphrates, but they were built with the finest quality baked brick and with great skill in masonry; they were often laid to a plan; and they had street drainage systems which few other third millenium urban centres had.... there is strong evidence of its seafaring reach and in this the Harappans could not be rivalled by the people of Mesopotamia, the Gulf or Egypt, even though Harappan metal technology was comparatively radimentary and the Harappans did not build grandiose pyramids as did the pharohas of Egypt".

एके ठिकाणी त्या लिहितात, "It could be argued that the grid plan settlement which characterizes Harappan urbanism is specific to new or relocated towns, or towns laid out afresh, that could not have grown out of old village origins."

एका तपशीलवार आराखड्यानुसार मोठी वसाहत उठवावी तसे हराप्पा व मोहेंजदडो या नगरांचे बांधकाम आढळते; आणि विटा उत्कृष्ट घडणीच्या व भाजलेल्या आढळतात; घरांची, गटारांची, विहिरींची आदी बांधकामेदेखील अचंबित करून सोडतात ही गोष्ट खरी. पण इथेच गोम आहे. भिलाई वा जमशेटपूर येथे पोलाद कारखाने उभारले तेव्हा त्या जागी फारतर आधी खेडेगावे होती. शहर उभारण्यासाठी जागा निवडून संपूर्ण शहर बांधले व बसविले गेले. ज्या वास्तुशिल्पकारांनी, अभियंत्यांनी, गवंडी-सुतार आदि कारागिरांनी शहर उभारले ते सर्व बाहेरून आलेले होते. अकुशल मजूर म्हणून स्थानिक माणसे अशा वेळी खपतात. त्यांच्यातली हुशार मंडळी वेगवेगळी कारागिरी कौशल्ये मजुरीची कामे करता करता आत्मसात करतात. पण त्यांची परंपरा अशी क्वचितच तयार होते. ही 'कंपनी शहरे' आखीवरेखीव, श्रेणीबद्ध, सुबक-स्वच्छ, गर्दीपासून मुक्त असतात आणि कंपनीचे प्रशासन ती तशी राखते. कारखान्यानेच काय जी जाग शहराला येत असेल ती. एरवी ते शहर 'निर्जीव' असते. सांस्कृतिक कार्ये उत्पन्न करावी लागतात. विशेषतः कनिष्ठ, गरीब पातळ्यांवरील कामगार-वस्त्यांचे स्वरूप सैनिकांच्या बराकींसारखे आढळते. बारीक-सारीक बांधकामांवर, विस्तारावर कंपनीचे नियंत्रण असते.

हराप्पा-मोहेंजदडो व या कोटीतील इतर मुख्य नागरकेंद्रे — आणि हराप्पा संस्कृतींमध्ये मुख्य ठाणी सर्व नगरे वा नागरकेंद्रेच होती — ही अशी शहरे/वसाहती होत्या. अशा शहर-वसाहतीतल्या अभिजनवर्गात त्यांच्यापुरते एक उच्चभ्रू सांस्कृतिक-धार्मिक जीवन आकारास येते हे आपण ब्रिटिश काळात अनुभवलेले आहे. कारकून-कारागीर-श्रमिक या पातळ्यांवरही त्यांचे त्यांचे एक सांस्कृतिक-धार्मिक जीवन आकारास येते. अशा दोन (वा अधिक) विश्वांमध्ये 'हराप्पा संस्कृती'तील शहरांमधील वस्तीची विभागणी झालेली होती. 'सिटॅडेल' म्हटले जाते त्या भागातल्या अभिजनवर्गाच्या धार्मिक-सांस्कृतिक जीवनशैलीचे स्वतंत्र चित्रण करता येते आणि सामान्यजनांच्या, त्यांच्या घरांमधील व आपापसातील धार्मिक-सांस्कृतिक जीवनशैलीचे चित्रण स्वतंत्र करता येते.

तात्पर्य असे की, हराप्पा संस्कृतीशी जोडलेल्या वैशिष्ट्यपूर्ण वस्तू (artefacts) जेथे सापडतात ती वा त्या जेथे बनवल्या जात ती ठाणी विस्तीर्ण क्षेत्रावर जरी सापडत असली तरी या संपूर्ण भौगोलिक प्रदेशातील गावे (लहान व मोठी) आणि हराप्पा-मोहेंजदडो ही नगरे यांचा मिळून एक विषम श्रेणीबद्ध पण एकात्म समाज बनण्याची प्रक्रिया घडलीच नाही. जर हा एक एकात्म संस्कृती असलेला समाज म्हणून



अनुक्रमणिका

आकारास आला असता तर ऱ्हासकाळानंतरही सातत्य आढळून आले असते, समूह-स्मृती राहिली असती, व वस्तू वा रचना यांच्या रूपात खाणाखुणाही उत्खननांमध्ये सापडल्या असत्या.

हराप्पा संस्कृती ही एतद्देशीय थोर संस्कृती व परंपरा म्हणून विकसित झाली नाही. मला असे वाटते की, मोठ्या कोरीव शिलालेखांचा, प्राथमिक पातळीवरील साहित्य-निर्मितीचा, लिपी व भाषा यांच्या वाढीचा अभाव हा याचाच पुरावा आहे. कच्चा माल दूरदूरवरून वाहून आणणे, त्यांचे पक्क्या मालात रूपांतर उद्योगालयांमार्फत आपल्या देखरेखी-खाली, मानकांनुसार व डिझाइननुसार करवून घेणे, त्यांची आयात-निर्यात हाताळणे यासाठी किमान आवश्यक तेवढी साक्षरता येथील व्यवस्थापकांजवळ होती; अत्यावश्यक किमान 'लिखापढी' ते करीत, अशीच छाप उमटते. अनेकानेक शिक्के (seals) सापडलेत; लेखन मात्र फारसे आढळत नाही. शिक्क्यांनी काम भागत असावे. मातीच्या 'पाट्यां'वर (clay tablets) कोरून नोंदी केल्या जात. त्या नोंदींचे 'दप्तर' जपून वर्षानुवर्षे ठेवण्याची त्या काळी येथील व्यवस्थापकांना गरज असेलच असे नाही; परदेशात स्थित मुख्यालयात ते काही मर्यादेत ठेवले जातही असावे.

प्रा. रत्नागर यांनी 'सागरी वाहतुकीद्वारा लांबलांबपर्यंत पोच' ('seafaring reach') याकडे निर्देश केला आहे. मालाची ने-आण करणारी गलबते कोठे बांधली जात, कोण चालवीत वगैरे तपशिलांवर उत्खननांमधून प्रकाश पडत नाही. प्रा. रत्नागर यांनी *दि टायग्रिस एक्स्पीडिशन — इन सर्च ऑफ अवर बिगिनिंग्ज* या थॉर हेयरदाल (Thor Heyer-dahl) यांच्या १९८० सालच्या पुस्तकाचा साधा उल्लेखही करू नये याचे आश्चर्य वाटते. युफ्रेटिस-टायग्रिस नद्यांच्या मुखांजवळील दलदलींच्या प्रदेशात (आजच्या दक्षिण इराकमध्ये) माजणाऱ्या एका प्रकारच्या गवताच्या दांड्यांपासून (reed) गलबते बांधीत असा अभ्यासांती निष्कर्ष काढून, तसे गलबत बांधून त्यामधून कराची बंदरापर्यंत सागरी प्रवासही त्यांनी केला. त्या प्रकारचे गवत सिंधू नदीकिनारच्या दलदलीच्या प्रदेशातही त्यांना मिळाले. हराप्पा संस्कृतीमधील सागरी व्यापारी वाहतूक ही सुमेरमधील व्यापारी पेढ्या आणि अरबी दर्यावर्दी जमाती यांच्या हाती होती, आणि त्यामुळे गलबत बांधणीचे तंत्रविज्ञान तिकडील काही समूहांनी 'गुपित' म्हणून स्वतःपाशी राखले असण्याची शक्यता आहे.

व्यापारी पेढ्यांनी एकत्र येऊन हा सर्व व्यवहार केला असे मानले तर, सिंधू नदीच्या खोऱ्यातील मध्यवर्ती ठाण्यांचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी त्या मंडळींना उचलावी लागली असेल, पण राज्यसत्ता विस्तीर्ण प्रदेशावर प्रस्थापित करण्याची गरज नसणार. ईस्ट इंडिया कंपनीचे काम येथे राज्यसत्ता प्रस्थापित न करता दीड पावणेदोनशे वर्षे चाललेच ना.

ब्राँझ युगातला मोठ्या मोक्याचा धातू म्हणजे तांबे व तांब्याबरोबर मिश्रण करावयाचे अन्य धातू होत. त्या धातूच्या औजारांना कळीचे महत्त्व होते. प्रा. रत्नागर यांचे विवेचन समजून घेतल्यावर मनावर अशी छाप उमटते की, बाहेरून येऊन येथे वसाहती/नगरे वा केंद्रे प्रस्थापित करणाऱ्यांनी 'ब्राँझ युग' येथे त्यांच्यापुरते आणले. ती एतद्देशीय घडामोड नव्हती. अर्थात, येथील लोकसमूहांपैकी अनेकांना हाताशी धरूनच विविध वस्तूंचे उत्पादन करणे शक्य होते. नगरे/नागर-केंद्रे यांमधील अभिजनवर्गाला जगण्यासाठी अन्नधान्यादी अनेक वस्तू लागतातच. व्यापारी देवाणघेवाण, वेठबिगार यांसाठीही स्थानिक मध्यस्थ/दलाल वर्ग लागतोच, व तो पुढे येतोही. हवा तो 'कच्चा माल' ठिकठिकाणाहून आणून देणारे ठेकेदार, पक्क्या मालाच्या उत्पादनाचे ठेके घेणारे ठेकेदार, स्थानिक श्रमशक्ती उपलब्ध करून देणारे ठेकेदार निर्माण झाले असणार व त्यांच्यापैकी काही मध्यस्थ/दलाल/ठेकेदार हराप्पा, मोहेंजोदडो व अन्य नागर केंद्रांमध्ये कालांतराने वस्ती करून राहिले असतील. अभिजनवर्गातही त्यांचा समावेश झाला असेल.

स्थानिक एतद्देशीय लोकसमूहांची बनलेली लहानमोठी खेडेगावे, त्यांचे धार्मिक-सामाजिक जीवन, अर्थव्यवस्था या सगळ्यांची मिळून एकात्म समाज व संस्कृती होती अशी कल्पना केली तर या समाजांचे धुरीणत्व करणाऱ्या व्यक्तींची, मुखियांची/नाईकांची व त्यांच्या एक ना एका 'समाज पंचायती'ची कल्पना करता येते. 'टोळीसमाज' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जमातींमध्येही राजकीय संरचना, श्रेणीबद्धता, अधिकार व सत्ता यांची विभागणी, न्यायदानाची व्यवस्था, आर्थिक-सामाजिक लाभांचे विषम वाटप या साऱ्या गोष्टी आढळतातच. दैवते, त्यांच्या पूजा, जत्रा-उत्सव, संप्रदायही आढळतात. अशा अनेक 'विकसित' जनसमूहांच्या व्यामिश्र क्षेत्रात हराप्पा नावाची ब्राँझयुगीन संस्कृती प्रविष्ट झाली. ती येथे सहासातशे

वर्षे भरभराटली. येथील ग्रामीण समाज व ब्राँझयुगीन संस्कृती यांच्यात जे आदान-प्रदान घडून आले त्याची कल्पना करता येण्यासारखी आहे. काही संमिश्रण झाले, पण संयोग घडून आला नाही. ब्राँझयुगीन संस्कृती येथे रुजली नाही, तिची परंपरा आकारास आली नाही. काही आदान-प्रदान होऊनही ती येथे उपरीच राहिली.

प्रा. रत्नागर लिहितात, "The archaeological phenomena we identify as Harappan... cease to appear in the archaeological record of the centuries between about 1900 and 1700 B.C. Additionally, a very large percentage of Harappan villages and towns were deserted during or before that period, so that no vestiges of subsequent cultures are to be found at them....."

हराप्पा संस्कृती पुरती नष्टच का झाली? एक ना एका स्वरूपात तिचे सातत्य का टिकून राहिले नाही, या प्रश्नाचे उत्तर प्रा. रत्नागर यांनी वेगवेगळ्या अंगांनी शोधले आहे. एकदम कोसळलेल्या नैसर्गिक आपत्तींमुळे ही संस्कृती एकदम ऱ्हास पावून नष्ट झाली हे स्पष्टीकरण त्यांना अमान्य आहे. तसेच आर्यांनी आक्रमण करून सिंधू संस्कृतीचा विनाश घडवून आणला ही उपपत्तीही त्या खोडून काढतात. जंगल बेसुमार तुटले (विटा भाजण्यासाठी, तांबे-'गाळण्या'साठी — (copper-smelting), जमिनींतून अन्नधान्य व इतर पिके सतत काढल्याने जमिनी निकस बनल्या वगैरे युक्तिवादांमध्ये तथ्यांश असला तरी एका विशाल संस्कृतीचा नाश घडवून आणावयास हे कारण पुरेसे नाही. हराप्पा संस्कृतीचा ऱ्हास सुरू झाल्यावरही लोक एकमेकांना धरून गावांमध्ये राहिले नाहीत याचे एक कारण त्यांना एकत्र बांधण्याऱ्या ऋणानुबंधांचा, धर्मश्रद्धेचा, धर्मपीठाचा अभाव असे म्हणण्यास जागा आहे, पण हे ऱ्हास-विनाश यांचे मूळ कारण ठरत नाही. मग कोणते कारण असावे?

एका टप्प्यावर प्रा. रत्नागर पुढील प्रश्न उपस्थित करतात. "Was the external trade of such importance that its termination would cause the Harappan economy to collapse and undermine the position of the elite?" इसवीपूर्व २००० नंतर दक्षिण मेसोपोटेमियन शहरांचे राजकीय वर्चस्व संपुष्टात आले. तेव्हा हराप्पाच्या किमती वस्तूंना मागणी उणावली. या संदर्भात त्या लिहितात, "Harappan overseas trade involved supplying, to the agriculturally wealthy and densely populated Mesopotamia, crafted items such as decorated carnelian beads, plus minerals such as fine wood, gold and lapis lazuli. Of significance is the fact that few of these items were procured within the Harappan heartland: each was available in a specific and separate source zone.... in the Bronze Age, other than culturally valued materials like lapis lazuli and shell there were also rare metals—copper, tin, arsenic-copper and lead — that were procured by riverine civilizations, often from appreciable distances away."

ईजिप्त, सुमेर वा हराप्पा या संस्कृती मालाच्या दूरवरील ने-आणीवर अवलंबून होत्या. या देवाणघेवाणीला उद्देशून 'व्यापार' हा शब्द वापरताना थोडी सावधानता बाळगायला हवी. नागर केंद्रांमधून वस्ती करून राहणाऱ्या लोकसंख्येच्या उदरनिर्वाहासाठी लागणाऱ्या वस्तु/सेवा आसमंतातील शेती-पशुपालन-कारागिरी व्यवसाय करणाऱ्यांकडून पुरवल्या जात असतील. याच्या बदल्यात कोणत्या वस्तू उत्पादकांना दिल्या जात असतील? जगण्यासाठी गरजेच्या नसलेल्या पण 'मन-मोहक' अशा वस्तू, धातूंची चांगली औजारे, साजशृंगारासाठी उपयोगी वस्तु, दागदागिने (अर्थात स्वस्तातले) अशा काही वस्तु समोर येतात. आजही, आतल्या दुर्गम भागातील आदिवासी आठवडा बाजारात कोणत्या वस्तु विकत घेतात हे पाहिले तर त्या काळच्या 'व्यापारा'ची कल्पना करता येते.

या संदर्भात प्रा. रत्नागरांचे, पुढील म्हणणे महत्त्वाचे आहे. विशिष्ट वस्तूंचा पुरवठा प्राप्त करून घेण्याच्या उद्देशाने (उदा. लाकूड, दगड वा धातू) मोहिमा आखल्या जात. हराप्पा संस्कृतीतली नगरे/नागर केंद्रे सभोवतालच्या लोकांपासून तशी वेगळीच होती. त्या म्हणतात, "We find that the largest Harappan cities do not emerge in the densest clusters of villages." प्राचीन मानवी

संस्कृतींचे प्रख्यात अभ्यासक-संशोधक व भाष्यकार गॉर्डन चाइल्ड यांच्या ध्यानात आलेली वस्तुस्थिती त्या स्पष्ट करतात : "....the key feature of Bronz Age economies was their orientation to the needs and tastes of the elite, and their dependence on elite organisation and control, specifically on trade expeditions, the sponsorship of key crafts, and the infrastructural arrangements these would have required."

प्रा. रत्नागर यांचे पुढील विधान विशेष महत्त्वाचे आहे. त्या लिहितात, "The evidence of seals, weights, and writing, as well as Mesopotamian literary references to the Meluhhans, their boats, wood and carnelian, indicates that it was the Harappans who were sailing into the Gulf, and not the Mesopotamians with their greater agricultural productivity and population densities.." गलबते वांधण्यासाठी लागणारे लाकूड मेसोपोटेमियात उपलब्ध नाही, तेथे गलबते वांधण्याची परंपरा असल्याचे आढळत नाही, असे प्रा. रत्नागर म्हणतात. पण थॉर हेयरदाल यांचे संशोधन, अभ्यास व प्रात्यक्षिक ध्यानात घेतले तर, वोरूसारख्या पदार्थाच्या सहाय्याने सागरी वाहतूक करू शकणारी गलबते बांधणारे व ती चालविणारे लोक त्या भागातल्या सागरी किनारपट्टीवर असावेत. हराप्पा संस्कृतीच्या दोन मोठ्या नगरांमध्ये व इतरही नागर केंद्रांमध्ये अनेक विशेष कारागिरीच्या वस्तूंचे उत्पादन होत होते हे उत्खननातील पुराव्यांच्या आधारे म्हणता येते. पण यांचा वव्हंशी सर्व गिऱ्हाईकवर्ग मेसोपोटेमियातील (कदाचित ईजिप्तमधील) सधन वर्गच होता. या वस्तूंच्या उत्पादनासाठी लागणारा कच्चा माल संपादित करून वस्तू बनवून निर्यात करण्याची कामगिरी अंगावर घेतलेल्या/टाकलेल्या समुदायांनी 'हराप्पा संस्कृती' येथे स्थापित केली ही गोष्ट अधिक शक्य दिसते. धातूची औजारे मेसोपोटेमियातून येत होती, ती घडविण्याची येथे परंपरा उत्पन्न झाली नाही, असे दिसते. येथील लोकांना कारागिरी शिकवली, आणि त्यांच्याकडून कुशल कामे मजूर म्हणून करवून घेतली. पण यामधून स्वतंत्र व स्वायत्त कसदार परंपरा निर्माण होत नाहीत. 'संस्कृतीच्या पूर्ण कोसळण्या'वर प्रा. रत्नागर भर देतात तो योग्यच आहे. असा तर्क होतो की, तुर्कमेनिया व (आजच्या) उत्तर-पूर्व इराण, अफगाणिस्थान, वलुचिस्थान व वायव्य सरहद्द प्रांत या भागांतील लोकांच्या स्थलांतरांमुळे, मेसोपोटेमियामध्ये, एकंदर अस्थिरता व उलथा-पालथींमुळे उत्पादित मालाला मागणी राहिली नाही व कच्चा मालही संपादित करणे अवघड बनले तेव्हा परकीय अभिजनवर्गाने इथून काढता पाय घेतला. तो घेताना त्याने अत्यंत महत्त्वाच्या काही वस्तू नेल्या असतीलच; पण, मुख्य म्हणजे, ज्यांना मेस्त्री (master-craftsmen) म्हणता येईल अशी माणसेही गेली असावीत. त्यामुळे हराप्पा संस्कृतीचे सातत्य टिकविणारे लोक येथे अभावानेच उरले असले पाहिजेत. म्हणून 'कोसळणे' आले. त्यानंतरच्या काळात भोवतालच्या लोकांमधील दांडगट टोळ्यांनी हल्ले करून लुटालूट, जाळपोळ, मारकाट आरंभली असली तर नवल नाही.

'दि इम्पॅक्ट ऑफ दि एन्ड ऑफ लाँग डिस्टन्स ट्रेड' या प्रकरणामध्ये प्रा. रत्नागर यांनी उत्खननांच्या जागी सापडलेल्या व न सापडलेल्या वस्तूंचे, औजारांचे, कच्च्या मालाचे पुष्कळ तपशील दिले आहेत. ते उद्‌बोधक आहेत. त्यांची अनेक निरीक्षणे मार्मिक आहेत. 'थोर हराप्पा संस्कृती'चे अस्तित्व त्यांनी त्यांच्या संपूर्ण विवेचनामध्ये आधारभूत धरल्याने त्यांना पडलेली कोडी त्यांना सोडविता येत नाहीत. त्यांची काही निरीक्षणे अशी :

(१) ".... not even the largest Harappan centres were to become locations of economic importance, pilgrimage, or political advantage in later ages."

(२) "Harappan glyptic and pottery painting does not lavish attention on ships in full sail or on constellations of the stars in the skies."

(३) "To clear land for agriculture we expect that axes for felling trees, hoes, spades and shovels would have been needed, and these are not easy to identify in the artefactual remains. The almost total absence of not only metal sickle blades but also ground stone axes and adzes at Harappan sites is puzzling."

अनुक्रमणिका






(४) 'Much more problematic is how the Harappans dug wells and ditches for irrigation and wells for the urban drinking water supply at cities like Mohenjodaro..'

हराप्पा संस्कृतीची नागर केंद्रे/नगरे यांचा आसमंतातील लोकांशी व त्यांच्या वस्त्यांशी, जगण्याशी जैव संबंध नव्हता; त्या विशेष उत्पादनांसाठी वा कार्यांसाठी वसविलेल्या वसाहती होत्या असे मानले तर बऱ्याच कोड्यांचा उलगडा होतो. अनेक प्रकारच्या विशेष उत्पादनांसाठी ताम्र वा ब्राँझ औजारांची गरज होती हे प्रा. रत्नागर यांनी स्पष्ट केले आहे. ही औजारे, सामान्यपणे, काम करीत असताना कारागिरांना उपलब्ध करून दिली जात पण एरवी ती 'मेस्त्री'वर्गाच्या ताब्यात असत; आणि ही औजारे इतकी मौल्यवान ठरत गेली की ती सहसा टाकून दिली जात नसत, वा औजारे वापरून झिजली, निकामी झाली की धातू परत गाळला जात असेल ही शक्यता मला दिसते. तेव्हा ती मोठ्या संख्येने न सापडणे समजण्यासारखे आहे. आसमंतातील गावांमध्ये जी तत्कालीन लोकांची जीवनशैली होती, शेती व उद्योग होते त्यांच्यासाठी ब्राँझ-ताम्र औजारे लागतही नसतील; लोक अश्मयुगात राहणारे असतील, हे शक्य आहे.

पश्चिम आशिया प्रदेशात इसवीपूर्व २००० नंतर राजकीय उलथापालथी झाल्या, लोकसमूहांची स्थलांतरे झाली, आणि यामुळे अनेक प्रकारच्या उत्पादनांसाठी लागणाऱ्या धातूंचा पुरवठा वेगळ्या दिशांनी 'वाहू' लागला, वेगळ्या राजकीय-आर्थिक केंद्रांना बळकटी आणू लागला. त्यांची अतिशय नेमकी तपशीलवार चर्चा प्रा. रत्नागर यांनी एका प्रकरणात केली आहे. हे स्थित्यंतर घडून आले तेव्हा हराप्पा-मोहेंजोदडो संस्कृतीच्या अस्तित्वाचा एक आधारच उखडला गेल्यासारखे झाले. मेसोपोटेमियातील राजवटीही या स्थित्यंतरांमुळे मोडकळीस आल्याने तोही आधार तुटला. परकी, उपरी, हराप्पा संस्कृती 'कोसळली'. मागे काय उरले? प्रा. रत्नागर लिहितात, "The Harappan civilization was succeeded by cultures we call 'chalcolithic' : small scale, usually with small, 'one- or two- room' cottages, very few crafts, a simple stone tool technology supplemented by a few forms of bone tools, and not many types of copper-bronze artefacts, often ornaments rather than tools." थोडक्यात, 'गावंढळ' संस्कृती मागे उरली – जी त्या प्रदेशातील लोकांची एतद्देशीय संस्कृती होती.

अभिजनवर्गीय उपभोगांच्या आधारे भरभराटणारी संस्कृती नष्ट झाली. पण लोकसंस्कृती व तिच्या जगण्यासाठी आवश्यक व उपकारक 'धर्म', शेती, उद्योग, सामाजिक संस्थात्मक जीवन कालांतराने आंतरिक जोम प्राप्त करून घेत भरभराटले, याचीही नोंद प्रा. रत्नागर घेतात ही गोष्ट महत्त्वाची आहे.

येथे सुविख्यात मेक्सिकन कवी, साहित्य व संस्कृती समीक्षक, तत्त्वज्ञ व भारतीय इतिहास व संस्कृती यांचे विचक्षण अभ्यासक ऑक्टोव्हिओ पाझ यांचा अभिप्राय शेवटी उद्धृत करणे अनुचित ठरणार नाही. पाझ लिहितात, "The connexion between the civilization of the Indus and that of India is doubtful, to say the least. Apart from the fact that they are separated by a millenium or more, that of the Indus appears to be more akin to the Mesopotamian world, and, specifically, to the Sumerian Babylonian world" (in *Conjunctions and Disjundctions*: foontnote on page 49).

●●








# अर्थव्यवस्था व समाज यांच्या पुनर्निर्माणाची दिशा

अम्लान दत्त

१९७० नंतरच्या काळात दोन भिन्न अर्थशास्त्रीय विचारप्रवाह एकाच वेळेला अस्तित्वात असल्याचे आढळते. त्यापैकी एका प्रवाहास आपण मुख्य प्रवाह किंवा शिष्टमान्य प्रतिष्ठित विचारधारा असे म्हणू शकू. विद्वज्जनांमध्ये ५. विचारधारेस अधिमान्यता आहे ही गोष्ट निर्विवाद. एक वैकल्पिक विचारधाराही अस्तित्वात आहे. जिच्याविषयी या विद्वत् वर्तुळामध्ये फारसा आदर नाही आणि तज्ज्ञ व्यावसायिक अर्थशास्त्रज्ञ तिची विशेष दखलपण घेत नाहीत.

'क्लासिकल' आणि 'निओक्लासिकल', 'कीन्शियन' आणि 'पोस्टकीन्शियन' अशा कालखंडांमधून शिष्टमान्य प्रतिष्ठित अर्थशास्त्रीय विचारप्रवाह यापूर्वीच गेलेला आहे. पण एकंदरीने विहंगमावलोकन केल्यास आपणांस असे आढळते की, पायाभूत तत्त्वांच्या बाबतीत 'बदल' नगण्य म्हणावा लागेल इतपतच राहिला आहे. तशी ही आश्चर्यचकित करणारी गोष्ट आहे. एक फ्रेंच म्हण सुप्रसिद्ध आहे. इंग्रजीमध्ये तिचा अनुवाद काहीसा पुढीलप्रमाणे होईल : 'The more it changes, the more it is the same thing!!' अर्थशास्त्रीय विचाराचा जो मुख्य प्रवाह आहे त्याला ही म्हण अतिशय चपखलपणे लागू पडते.

'पोलिटिकल इकॉनॉमी'च्या मुख्य विचारप्रवाहाचा उद्गम ॲडॅम स्मिथ यांच्यापासून होतो. अर्थशास्त्राच्या विषयात जे विचारवंत होऊन गेले त्यांच्यामध्ये ॲडॅम स्मिथ यांची गणना खरोखरच असामान्य विचारवंत व लेखक अशीच करावी लागेल. बाजारकेंद्री अर्थव्यवस्थेचे (market economy) प्रवक्ते म्हणून त्यांनी जी वैचारिक मांडणी केली ती आज दोनशे वर्षांनंतरही पायाभूत व प्रमाण म्हणून स्वीकारली जाते.

'श्रमविभागणी' करता येण्यावर संपत्तीमध्ये वाढ होणे अवलंबून आहे; श्रमविभागणीमुळे उत्पादनपद्धतींचे यांत्रिकीकरण तसेच तंत्रविज्ञानात्मक प्रगती या गोष्टी सुकर होतात. आणि ही सर्व प्रक्रिया आर्थिक व्यवहार बाजारपेठेच्या कक्षेत किती प्रमाणात आलेले आहेत यावर अवलंबून राहते. ही गोष्ट राष्ट्रीय अर्थव्यवस्थेच्या बाबतीत जेवढी खरी आहे तेवढीच ती जागतिक अर्थव्यवस्थेच्याही बाबतीत खरी आहे. ज्या बदलत्या वास्तवाचे वर्णन जागतिकीकरण असे आपण आज करीत आहोत आणि खुला व्यापार हे ज्या जागतिकीकरणाचे एक अंगभूत वैशिष्ट्य सांगितले जाते त्या जागतिकीकरणाला वरील बालबोध प्रतिपादन अगदी फिट बसते.

वर जो आर्थिक दृष्टिकोन विशद केला आहे त्या दृष्टिकोनाच्या व्यापक चौकटीत फक्त नवजात उद्योगांना (infant industries), आणि तेदेखील काटेकोरपणे आरंभीच्या काळात, संरक्षण देण्याची गोष्ट विनासायास सामावून घेता येते. युद्धकलेत घडून येत असलेल्या महान क्रांतीविषयी ॲडॅम स्मिथ आपली निरीक्षणे लक्षपूर्वक नोंदवीत, पुढे जाऊन राष्ट्रीय सुरक्षेचा हितसंबंध जपण्याच्या दृष्टीने "श्रीमंतीत वाढ होण्यापेक्षा राष्ट्राची सुरक्षा ही अधिक महत्त्वाची बाब आहे", या युक्तिवादाच्या आधारे खुल्या व्यापाराच्या तत्त्वाला काही प्रमाणात मुरड घालण्याचे समर्थन करताना आढळतो, ही गोष्ट नमूद करणे येथे महत्त्वाचे ठरते.

खुला व्यापार आणि बाजारपेठी अर्थव्यवस्था यांचा कैवार घेणारे आधुनिक अर्थशास्त्रज्ञ त्याच वेळी आर्थिक व्यवहारांच्या क्षेत्रात शासनाच्या भूमिकेचे महत्त्व मान्य करीत असतात. उदाहरणार्थ, सर्वांगीण आर्थिक विकास घडून येण्यासाठी ज्या प्रकारच्या सोयी-सुविधांची (infrastructure) पायाभूत उपलब्धता अत्यावश्यक असते त्या पायाभूत सोयीसुविधा पर्याप्त प्रमाणात उपलब्ध करून देण्याचे विशेष कर्तव्य आणि जबाबदारी शासनाची असते असे आग्रहपूर्वक म्हटले जाते. येथेही मूलभूत संकल्पना ॲडॅम स्मिथने विलक्षण स्पष्ट स्वरूपात मांडलेली आपल्याला दिसते. अशा अनेक सार्वजनिक संस्था आणि सार्वजनिक कामे उभारावी व चालवावी लागतात ज्यांच्या कार्यामुळे साऱ्या समाजाचा उच्च कोटीचा लाभ होतो. पण अशा संस्था वा अशी कामे व्यक्तींनी वा व्यक्तींच्या समूहांनी स्वखर्चाने उभारावयाची वा चालवावयाची म्हटले तर त्यावर होणारा त्यांचा खर्च वसूल होऊन वर त्यांना थोडाफारही नफा होण्याची कोणतीही शक्यता नसते

आणि त्यामुळे व्यक्तिगत लाभाच्या आकर्षणाने अशी कामे व अशा संस्थांची उभारणी होईल या अपेक्षेने खासगी उद्योजकांच्या अभिक्रमावर ही जबाबदारी सोपवणे कदापीही व्यवहार्य ठरणार नाही. अशा संस्थांची उभारणी करणे व अशी कामे समाजात या संस्थांमार्फत होत राहतील हे पाहणे हे एक सार्वभौम राजाचे (वा राज्यसंस्थेचे) पायाभूत व अत्यावश्यक कर्तव्य होय, असे ॲडॅम स्मिथने अतिशय स्पष्टपणे म्हटल्याचे आढळते.

सार्वजनिक कार्ये आणि सार्वजनिक संस्था दोन्हींचा स्पष्ट निर्देश ॲडॅम स्मिथ त्याच्या प्रतिपादनात करतो याची विशेष दखल घ्यायला हवी. वेगळ्या शब्दांत हीच गोष्ट मांडावयाची झाल्यास असे म्हणता येईल की, व्यापार व उद्योगधंदे यांच्या वाढीसाठी उपकारक अशा पायाभूत सेवा व सुविधा यांची उभारणी करण्यात शासनाने पुढाकार घेणे एवढे पुरेसे नाही. एवढे केल्याने शासनाने आपले कर्तव्य पार पाडले असे होत नाही. ज्यांच्यापासून दृश्य स्वरूपात पैशाच्या रूपात नफा होत नाही किंवा ज्यांमुळे भौतिक संपत्तीत वाढ होताना दिसत नाही अशा स्वरूपाच्या शिक्षण, आरोग्य व स्वास्थ्य-संवर्धन ह्या क्षेत्रांत सक्रिय रस घेऊन सर्वांना शिक्षणाचा व आरोग्यसंवर्धक सेवांचा लाभ मिळेल हे पाहण्याची जबाबदारी शासनाची आहे, हा बोध ॲडॅम स्मिथच्या वरील प्रतिपादनामधून आपणांस काढता येते. राजाची म्हणून जी कर्तव्ये असतात त्यांच्यामध्ये लोकांचे उद्बोधन करणाऱ्या या दोन प्रकारच्या संस्था उभारणे व कार्ये पार पाडणे याचा खास निर्देश ॲडॅम स्मिथने केलेला आढळतो. तरुणांचे शिक्षण तसेच सर्व वयाच्या लोकांचे उद्बोधन ही दोन कामे पार पाडणे हे राजाचे कर्तव्य आहे असे ॲडॅम स्मिथने लिहून ठेवले आहे.

काही प्रकारचा खर्च शासनाने आवर्जून करावा याचे समर्थन, मुख्यत्वेकरून, असा खर्च करण्यामधून साऱ्या समाजाचे कल्याण होते वा सारा समाज अधिक उन्नत अवस्थेस पोचतो या प्रकारचे असते. या प्रकारचा खर्च करण्यामधून आर्थिक वृद्धी किती होते हा मुद्दा उपस्थित करणे अप्रस्तुत मानले जाते. वृद्धापकाळाची सोय म्हणून दिले जाणारे निवृत्तिवेतन हे या प्रकारच्या खर्चाचे एक उदाहरण सांगता येईल. शिक्षण आणि आरोग्य या दोन क्षेत्रांमध्ये शासनाने गुंतवणूक करावी याचे समर्थन सामाजिक कल्याण व सुरक्षा यांच्या नावे केले जात नाही. या दोन क्षेत्रांतील गुंतवणुकीचे समर्थन वेगळ्या पायावर केले जाते. या दोन क्षेत्रांतील गुंतवणुकीचा संबंध समाजकल्याणाशी आहे, नाही असे नाही; पण या क्षेत्रांतील गुंतवणुकीमुळे श्रमिकांच्या उत्पादकशक्तीत वाढ होते आणि या वाढीमुळे राष्ट्राच्या संपत्तीत भर पडण्यास मदत होते. या कारणाने शिक्षण व आरोग्य या क्षेत्रांतील गुंतवणूक ही अर्थव्यवस्थेची पुष्टी करणाऱ्या पायाभूत सेवासुविधांपैकीच एक बाब आहे असे म्हणण्यास व हे कारण पुढे करून शासनाच्या पायाभूत जबाबदाऱ्या व कर्तव्ये यांच्यात या बाबीचा समावेश करण्यास जागा सापडते.

आज आपण ज्या अर्थाने जागतिकीकरणाची प्रक्रिया समजून घेतो त्या अर्थाने ही एक नवीनच घडामोड आहे. जागतिकीकरणाला उचलून धरणाऱ्या व तिची पुष्टी करणाऱ्या ज्या काही विशिष्ट संस्था व यंत्रणा आहेत त्यांच्याशी तुलना होऊ शकेल अशा संस्था व यंत्रणा आधीच्या काळात अस्तित्वात असल्याचे आपणांस आढळत नाही. पण खुला व्यापार आणि बाजारपेठीय अर्थव्यवस्था कोणत्याही एका विशिष्ट राष्ट्रापुरती मर्यादित न राहता पृथ्वीवरील सर्व क्षेत्रांना जोडण्यासाठी त्यांचा उपयोग करून घेता येईल; तसेच ही खुली अर्थव्यवस्था कार्यवाहीत आणण्यासाठी राज्यसंस्थेवर विशेष जबाबदाऱ्या सोपवाव्या लागतात; राज्यसंस्थेची या संदर्भात काही विशेष कर्तव्ये असतात, या प्रकारच्या मूलभूत कल्पना प्रतिष्ठित अर्थशास्त्रज्ञांच्या वर्तुळात दीर्घकाळापासून शिष्टमान्य आहेत. हा 'रूढ शहाणपणा'चा (conventional wisdom) भाग म्हणता येईल. भारताच्या नव्या आर्थिक धोरणाला सुव्यवस्थित आकार देण्याचे प्रयत्न १९८०च्या दशकापासून चालू होते. त्यात यश येऊन अखेरीस १९९१ साली नव्या आर्थिक धोरणांचा अंगीकार केला गेला. पौर्वात्य आणि पाश्चिमात्य, दोन्ही देशांमध्ये अर्थशास्त्रीय विचाराचा जो शिष्टमान्य व वरचढ प्रभाव आहे त्या विचार-धारेशी जुळती मिळती अशीच ही नवी आर्थिक धोरणे आहेत.

औद्योगीकरणाची एक वैकल्पिक वाट रूढ व प्रतिष्ठित करण्याचा प्रयत्न स्टॅलिनशाहीच्या काळात रशियात केला गेला. पण हे आव्हान सुमारे वीस वर्षांपूर्वी पुरते मोडून निघाले. आंतरराष्ट्रीय पातळीवर कर्जे देऊ करणाऱ्या ज्या 'सावकारी' संस्था व यंत्रणा आहेत त्या कर्जे मंजूर करताना ज्या अटी घालीत आहेत ('conditionalities') त्यांच्या-

विरुद्ध भारतात कठोर टीकाटिप्पणी होत असली तरी औद्योगीकरणाची वैकल्पिक स्टॅलिनवादी वाट चोखाळण्यास भारतातही कोणी उत्सुक आहे असे दिसत नाही. या संदर्भात नामवंत भारतीय अर्थशास्त्रज्ञ जगदीश भगवती यांनी त्यांच्या *इंडिया इन ट्रँझिशन* या ग्रंथात काढलेले उद्‌गार येथे उद्‌धृत करणे उद्‌बोधक होईल. "वर्ल्ड बँक आणि आय.एम.एफ. ज्या अटी घालत आहेत त्या 'परक्या' आहेत आणि त्या भारतावर लादल्या जात आहेत ही काही मंडळींची प्रतिक्रिया हास्यास्पद आहे. भारताने ही पथ्ये काटेकोरपणे पाळली पाहिजेत हा विचार आम्हापैकीच काहीजणांनी विकसित केला आणि तो या आंतरराष्ट्रीय संस्थांनी स्वीकारला ही वस्तुस्थिती आहे."

आर्थिक विचारधारेच्या क्षेत्रातल्या या शिष्टमान्य पारंपरिक भूमिकेला कोणताच खरा पर्याय नाही असा याचा अर्थ करावयाचा काय? हीच एक भूमिका जर वस्तुनिष्ठ असली तर ती मोठी आश्चर्यचकित करणारी गोष्ट ठरेल. गेल्या अर्धशतकामध्ये सर्व जगभरच भौतिक आणि सामाजिक परिस्थितीमध्ये फार मोठा बदल घडून आला आहे आणि या बदलाबरोबर नवे प्रश्न उपस्थित झाले आहेत. या प्रश्नांची उपेक्षा करता येण्यासारखी स्थिती नाही. या नव्याने उपस्थित झालेल्या समस्या इतक्या ठोस आहेत की, सामाजिक शास्त्रांच्या मांडणीवर त्यांचा आघात होण्यावाचून गत्यंतर नाही. याचाच अर्थ असा की, सामाजिक शास्त्रांची फेरमांडणी करणे आज अपरिहार्य बनले आहे. सामाजिक शास्त्रांच्या क्षेत्रात सर्वात अधिक सुसंघटित शास्त्र म्हणजे अर्थशास्त्र होय, असा दावा अर्थशास्त्राच्या वतीने केला जातो. अर्थशास्त्र हे इतके भारदस्त व सुप्रतिष्ठित असल्यामुळे बहुधा त्याची फेरमांडणी करणे ही सगळ्यात अधिक अवघड जाणारी गोष्ट म्हणावी लागेल. पण भोवतालच्या परिस्थितीतील बदलच एवढे मोठे आणि गुणात्मक आहेत, की फेरमांडणीशिवाय अर्थशास्त्रालाही पर्याय उरलेला नाही. आधीच्या काळातील अर्थशास्त्रज्ञ विचारवंतांनी अर्थशास्त्राची बांधणी ज्या चौकटीमध्ये केली त्या चौकटीच्या मर्यादा ओलांडून अर्थशास्त्राला पुन्हा एकवार प्रवाही बनावेच लागणार आहे. ज्या भौतिक बदलांचा निर्देश वर केला आहे ते बदल इतके सर्वज्ञात आहेत की त्यांची एक भली मोठी जंत्री सादर करणे कंटाळवाणे ठरेल. वानगीदाखल काही ठळक बदलांचा निर्देश करणे पुरेसे ठरेल.

चिरस्थायी स्वरूपाच्या अर्थव्यवस्थेचे रूप काय असेल आणि ती कशी कार्यवाहीत आणता येईल हा गांधीजींच्या खोल आस्थेचा व चिंतनाचा विषय होता. त्यांच्या काळातील विद्वान अर्थशास्त्र्यांनी मात्र या मुद्याकडे जवळपास लक्षच दिले नाही. "आजचे प्रतिष्ठित शिष्टमान्य अर्थशास्त्र पृथ्वीकडे कच्च्या मालाचा पुरवठा करणारे अक्षय कोठार म्हणून तसेच आर्थिक उलाढालींमधून व दैनंदिन जीवनव्यवहारातून जो सर्व प्रकारचा गाळ व कचरा उत्पन्न होतो तो रिचवण्याचा, ज्याला तळ नाही असा एक शोषखड्डा म्हणूनच पाहते." असे जेम्स रॉबर्टसन ह्यांनी लिहिले आहे. लक्षणीय गोष्ट अशी की, त्यांचे हे अवतरण ज्या ग्रंथामधून घेतले आहे त्या ग्रंथाचे नाव *फ्यूचर वेल्थ, दि न्यू इकॉनॉमिक्स फॉर द ट्वेंटिफर्स्ट सेंचुरी* असे आहे. १९७० च्या दशकात खनिज इंधनतेलाच्या पुरवठ्याची कोंडी केली गेल्याने जो पेचप्रसंग उद्‌भवला त्यानंतरच, ज्यांचे नैसर्गिक चक्रांच्या द्वारा पुर्नभरण होऊ शकत नाही अशा संसाधनांचे साठे एक ना एक दिवस संपणार आहेत, याचे भान अर्थशास्त्रज्ञांना झाले. खनिज इंधनतेल हे असे एक संसाधन आहे. या संसाधनाचे साठे झपाट्याने संपत चालले आहेत. ते संपल्यानंतर मग काय होणार, या प्रश्नाभोवती त्या काळी बरीच चर्चा प्रथमच उपस्थित झाली.

येथे दोन मुद्दे विचारात घ्यावे लागतात. पुनर्भरण न होणाऱ्या संसाधनांचे साठे कितीही प्रचंड असले तरी अखेरीस संपत असतात. त्यामुळे अमर्याद काळपर्यंत आर्थिक वाढ घडवून आणण्यासाठी त्यांच्यावर विसंबता येत नाही. खनिज इंधनतेलाच्या संदर्भात आणखी एक समस्या अटळपणे उपस्थित होते. हे तेल जाळल्यामुळे पर्यावरण प्रदूषित होते. कारण हवेमध्ये अनेक विषारी वायू फेकले जातात. उदाहरणार्थ, कार्बनडायऑक्साइड. खनिज इंधनतेलाच्या ज्वलनामधून पृथ्वीच्या तापमानामध्ये वाढही होते. पृथ्वीच्या तापमानात अशी कायमची वाढ चार-सहा अंशानेदेखील झाल्यास कोणते गंभीर परिणाम संभवतात यांची चर्चा अलीकडच्या काळात सातत्याने होत आली आहे. या समस्यांमध्ये भर टाकणारी आणखी एक समस्या मोठ्या प्रमाणावर होत असलेल्या जंगलतोडीमुळे उत्पन्न होत आहे. पृथ्वीच्या अनेक भागांमध्ये विभिन्न कारणांस्तव जंगले पद्धतशीरपणे नष्ट करण्यात येत आहेत. यामुळे मानवजात आणि वनस्पती सृष्टी ह्यांच्या

अनुक्रमणिका

परस्पर नात्यातील समतोल ढळतो. याचे साधे कारण असे की, माणसे प्राणवायू श्वासाच्या रुपाने आत घेतात आणि कार्वनडायऑक्साइड उच्छ्वासाच्या रूपाने बाहेर टाकतात; तर झाडे बरोबर याच्या उलट कार्बनडायऑक्साइड शोषून घेत प्राणवायू हवेत सोडतात.

वर जी वस्तुस्थिती वर्णिली आहे त्यापासून हाती येणारा एक निष्कर्ष अगदी स्पष्ट आहे. मानवजातीसाठी जर पृथ्वी ही वसती करण्यायोग्य म्हणून कायम राहावयाची असेल तर आजच्या अर्थोत्पादक कार्यांचा पाया असलेल्या तंत्रविज्ञाना-मध्ये दूरगामी बदल घडून येणे आवश्यक आहे. पण तंत्रविज्ञान आणि सामाजिक संस्था या इतक्या घनिष्ठपणे अन्योन्याश्रयी आहेत की, आपली तंत्रवैज्ञानिक बैठक जर मूलतः वेगळी झाली तर सामाजिक संस्थांची क्रांतिकारक पुनर्रचना त्यासोबत करावीच लागेल. सामाजिक पुनर्रचनेचे वळण व दिशा कोणती असेल याविषयी सामाजिक शास्त्रज्ञांना आणि अर्थशास्त्रज्ञांना-देखील रस असायला हवा. किंबहुना तो त्यांच्या चिंतनाचा एक मध्यवर्ती मुद्दा बनायला हवा आहे.

सापेक्षतः कमी विकास पावलेल्या देशांमध्ये 'लोकसंख्येचा स्फोट' घडून आला आहे. याच्या परिणामांची काही दखल येथे घ्यायला हवी. यांपैकी काही देश हे आधीच लोकसंख्येच्या दृष्टीने दाटीवाटीचे आहेत. भारत हा अशा दाट लोकसंख्येच्या देशांपैकी एक आहे. अशा देशांमध्ये भरीला लोकसंख्येचा स्फोट जर झाला तर त्याचे परिणाम विशेषच गंभीर होणार हे वेगळे सांगावयास नको. लोकसंख्या जेव्हा वेगाने वाढते तेव्हा मानवी वस्तीच्या सीमा या अपरिहार्यपणे विस्तार पावतात. त्या अशा विस्तार पावल्या की जंगलाखालील जमिनीवर अतिक्रमण होते, जंगले तोडली जातात आणि शेतजमीन तयार केली जाते. याचा दूरदृष्ट्या जो विपरीत परिणाम होणार असतो त्याकडे क्वचितच लक्ष दिले जाते. पण ही बाब गंभीर आहे कारण या बदलाचे परिणाम पर्जन्यमानावर, भूपृष्ठावरील भूगर्भातील पावसाच्या पाण्याच्या साठ्यांवर आणि पाण्याच्या वाटपावर विपरीत होतात. या बदलांमुळे जमिनीची उत्पादनक्षमता घटते. काही वेळा तर ती इतकी घटते की, विस्तीर्ण प्रदेशाचे वाळवंटीकरण होण्याचा धोका ओढवतो.

भारतामध्ये स्वातंत्र्यानंतरच्या पन्नास वर्षांच्या काळात लोकसंख्या जवळपास तिप्पट झाली आहे. लोकसंख्यावाढीमुळे दरडोई उत्पन्नाच्या वाढीवर रोक लागला आहे. एवढेच नव्हे तर, ज्यांना पर्याप्त प्रमाणात रोजगार मिळत नाही किंवा ज्यांना रोजगाराच्या अभावी बेकार म्हणूनच राहावे लागते — आणि अशी ज्यांची स्थिती नेहमीसाठीचीच म्हणून बनलेली आहे — अशांच्या संख्येत सतत वाढ होत राहणे हादेखील लोकसंख्येच्या विस्फोटाचा एक विपरीत परिणाम होतो. यातून जी समस्या उत्पन्न होते तिच्या सोडवणुकीच्या दृष्टीने नव्याने खोलवर विचार व्हायला हवा आहे.

रूढ चाकोरीत राहून विचार करणाऱ्या अर्थशास्त्रज्ञांच्या दृष्टीने राष्ट्रीय उत्पन्नातील वाढीचा दर चढा राहणे हे सर्वात महत्त्वाचे उद्दिष्ट असते आणि हे उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने वित्तीय शिस्त लावण्याच्या जोडीला अर्थव्यवस्थेतील विभिन्न निर्बंध सैल करण्याची म्हणजे उदारीकरणाची रणनीती अंगिकारणे या बाजूने त्यांचा कौल पडतो. या उपाययोजनांमुळे निर्यातीमध्ये भरीव वाढ होईल आणि परदेशी भांडवल सरळसरळ येथील उद्योगधंद्यांमध्ये गुंतवले जाण्याचे प्रमाण वाढेल ही यामागे अपेक्षा असते. पण या रणनीतीचा अवलंब केल्यानंतर आयातीमध्येदेखील वाढ होण्याचा संभव कायम राहतो आणि आयात वाढत गेल्यास व्यापारशेष (balance trade) आजच आपल्याला प्रतिकूल आहे तो कायम तसा राहील हे संभवते. आर्थिक वाढीचा दर चढा राहिल्यास दरडोई उत्पन्नामध्ये पूर्वीपेक्षा अधिक वेगाने वाढ होईल, आणि आपल्या लोकसंख्येपैकी शिखरस्थ वीस टक्के लोकसंख्येची आर्थिक स्थिती भरीव प्रमाणात सुधारेल; तसेच खालच्या पायऱ्यांवरील लोक-समूहांच्या उत्पन्नातही वाढ होईल; देशातील सुप्रतिष्ठित अर्थशास्त्रज्ञांच्या समुदायातील एका वजनदार गटाचा युक्तिवाद या आशयाचा आहे.

आता, वरील युक्तिवादामध्ये काही तथ्यांश जरूर आहे. नवीन आर्थिक धोरणांचा अंगीकार करण्यापूर्वीच्या काळात आपले आर्थिक धोरण हे, निर्यात वाढविण्यात आपणांस यश येणे असंभवनीय आहे, या गृहीतकृत्यावर आधारलेले होते. हे गृहीतकृत्य अवास्तव असल्याचे अनुभवाने दिसून आले आहे. आपल्या अर्थव्यवस्थेतील जो 'सुसंघटित' विभाग आहे त्याचे वळण निर्यात वाढविण्याच्या दिशेने बदलायला हवे असा पक्ष समर्थपणे मांडला जाऊ शकतो. म्हणजेच व्यवहारात निर्यात वाढविणे ही या विभागाच्या आवाक्याबाहेरची गोष्ट नाही. आर्थिक उतरंडीतील खालच्या पायऱ्यांवरील

लोकांच्या उत्पन्नाचे मानही वर उचलले जाईल असे जे म्हटले जाते त्यातही तथ्य आहे; जे श्रमिक व कर्मचारी स्वतःच्या संघटना प्रभावीरीत्या उभारू शकतात व बलिष्ठ करू शकतात, आपल्या मागण्यांचा रेटा उत्पन्न करू शकतात त्यांच्या पदरांमध्ये वाढीव उत्पन्न पडण्याची शक्यता बरीच आहे. पण जागतिकीकरणाचे धोरण सरसकट अंगिकारण्यामधून, आर्थिक वाढीचा दर त्यामुळे समजा वाढला तरी, केवळ या उपायामुळे आपली अपर्याप्त रोजगारीची आणि बेरोजगारीची दीर्घकाळ कायम राहिलेली समस्या सुटेल अशी समजूत करून घेणे मात्र निखालस आत्मवंचक ठरेल.

आपल्या पुष्कळशा कारखान्यांमध्ये वा कार्यालयांमध्ये वा सार्वजनिक उद्योगांमध्ये खोगीरभरती केली गेलेली आहे. म्हणजे कामासाठी आवश्यक तेवढ्या माणसांपेक्षा पुष्कळ अधिक माणसांना कामावर घेतले गेलेले आहे. पण ही वस्तुस्थिती झाकली जाते; कारण जेवढे दाम आपण घेतो तेवढ्याचे काम चोखपणे देण्याची संस्कृती आपल्याकडे अस्तित्वात नाही. म्हणून सर्वांना भरपूर काम आहे काम उरकत नाही, अशी छाप उमटवली जाते. कार्यक्षमता सुधारण्याच्या दृष्टीने 'एक्झिट पॉलिसी'चा – म्हणजे फाजील माणसांना कामावरून काढून टाकणे तसेच कंपनी, कारखाना वा उद्योग जर सतत नुकसानीत चालत असेल तर तो उद्योग, कारखाना किंवा कंपनी बंद करणे याला रीतसर परवानगी देणारे धोरण – अंगिकार करणे याला गत्यंतरच नव्हते. कारण कार्यक्षमता जर उच्च दर्जाची प्रस्थापित करता आली नाही तर आपण जगाच्या बाजारपेठेतल्या स्पर्धेमध्ये टिकून आपला माल विकू शकणार नाही. औद्योगिक वाढीचा दर आपण पुष्कळ अधिक साध्य करण्याची आशा बाळगली तरी, आणि तसा तो साध्य करण्यात यश प्राप्त केले तरी, पुढील वीस वर्षे तरी अर्ध-रोजगारी आणि बेरोजगारी यांची समस्या आपल्याला आजच्या इतकीच भेडसावत राहणार आहे. यावर खरा परिणामकारक उपाय एकच आहे. आपल्या 'संघटित' व 'औपचारिक' अर्थव्यवस्थेच्या चौकटीच्या बाहेर असलेले जे विस्तीर्ण क्षेत्र आहे त्याची आमूलाग्र फेररचना करूनच रोजगाराची समस्या सोडविता येणे शक्य आहे. 'मुख्य प्रवाहा'तील अर्थशास्त्रज्ञ ज्या मर्यादेत फेररचनेची गोष्ट करीत आले आहेत त्याच्या तुलनेत वस्तुतः आवश्यक असलेली फेररचना ही फार दूरवर व खोलवर पोचणारी असावी लागेल.

बेरोजगारीची समस्या न सोडविल्यास, विशेषतः ग्रामीण भागातील 'छुप्या' बेरोजगारीच्या समस्येची सोडवणूक योग्यरीत्या न झाल्यास कोणते परिणाम संभवतात यांचा अंदाज घेणे या ठिकाणी उपयोगाचे ठरेल. बेरोजगारीची समस्या आपण सोडवू न शकल्यामुळे रोजगाराच्या शोधात शहरांमध्ये लोकांचे लोंढे ग्रामीण भागांतून येत राहिले आहेत. इतक्या साऱ्या लोकांना रोजगार मिळून ते शहरांमध्ये नीटपणे व समाधानकारकरीत्या सामावले जाऊ शकत नाहीत; शहरात येऊन थडकणाऱ्या लोकांचे प्रमाण फाजील जास्त आहे. सबंध देशभर एक प्रकारची रोगट अवस्था पसरत चाललेली आपल्याला अनुभवाला येते. यात शहरेही आली आणि खेडीही आली. या परिस्थितीचा फायदा राजकारणी लोक उठवीत असल्यामुळे आणि बेकायदेशीर धंद्यांची उभारणी जोरात होत राहिल्याने परिस्थिती पुष्कळदा स्फोटक रूप धारण करते. समाजजीवन अशा प्रकारे रोगट बनून सडत जात आहे. या अधःपतनाला आपण पायबंद कसा घालू शकू?

मुख्य प्रवाहातील अर्थशास्त्रज्ञ पाश्चिमात्य देशांच्या प्रारूपाने प्रभावित झालेले असल्याने बाजारपेठी अर्थव्यवस्थेच्या चौकटीत संपूर्ण अर्थव्यवस्थेसाठी एकच एक उपाययोजना लागू करण्याच्या भाषेतच ते विचार करताना आढळतात. पण हे प्रारूप वास्तवाशी मेळ खात नाही, आणि बदलत्या परिस्थितीमध्ये परिणामकारक ठरतील अशा दिशेने विचारांचे वळण अद्याप पडत नाही.

भारतीय अर्थव्यवस्था, किंबहुना खरे तर जागतिक अर्थव्यवस्था, ही अनेकस्तरीय अर्थव्यवस्था आहे; तशीच ती बहुरूपी पण आहे. एका स्तरावर आणि एका रूपाच्या संदर्भात जी उपाययोजना अनुरूप ठरते ती दुसऱ्या स्तरावर व दुसऱ्या रूपाच्या संदर्भात काम देत नाही. अर्थव्यवस्था अनेकस्तरीय आहे आणि एकाच वेळी ती अनेक रूपांमध्ये अस्तित्वात असते ही वस्तुस्थिती आपल्या अर्थशास्त्रीय विचारामध्ये मुरवून घेण्याची आवश्यकता आहे.

*ए न्यू इकॉनॉमिक्स फॉर दि ट्वेंटिफर्स्ट सेंच्युरी*चे लेखक जेम्स रॉबर्टसन लिहितात की, एकविसाव्या शतकातील अर्थव्यवस्था ही बहुस्तरीय, सर्व जग व्यापणारी एकच एक अर्थव्यवस्था आहे. 'स्वस्थ मानवीय' आणि 'पर्यावरणीयदृष्ट्या संतुलित' अशा भविष्याची हमी देणारी अर्थव्यवस्था आणि सतत विस्तार पावण्याच्या मागे दौडणारी पागल

अर्थव्यवस्था यांच्यात ते भेद करतात. सतत विस्तार पावण्याच्या मागे असलेल्या अर्थव्यवस्थेचे प्रारूप आजच्या मान्यवर अर्थशास्त्रज्ञांच्या मनात पक्के रुतून बसलेले आहे. भविष्यासाठी ज्या शिफारशी ते करतात त्या शिफारशींमागील मूळ प्रेरणा या प्रारूपापासून त्यांना मिळालेली असते. पर्यावरणीय संतुलन व संवर्धनाचे मुद्दे यांची ते अर्थशास्त्रज्ञ सर्वस्वी उपेक्षा करतात असे म्हणणे योग्य होणार नाही; पण अर्थव्यवस्थेची सतत वाढ आणि तिचा सतत विस्तार ही उद्दिष्टे त्यांच्या नजरेमध्ये कायम अग्रेसर असतात.

भारतामध्ये ज्यांच्या हातांना काम हवे आहे अशा श्रमिकांच्या संख्येत सतत भरच पडत आहे. त्या सर्वांना पर्याप्त रोजगार उपलब्ध होण्यासाठी ज्या दराने औद्योगिक-आर्थिक वाढ होणे आवश्यक ठरेल असा दर खात्रीपूर्वक सांगता येईल व निश्चित करता येईल ही गोष्ट व्यवहार्य नाही, हे तथ्य स्वीकारणे आजच्या मान्यवर अर्थशास्त्रज्ञांना शक्य होत नाही. अर्थशास्त्रज्ञ व त्यांचे अर्थशास्त्रीय विचार या दोन्ही गोष्टी अर्थव्यवस्थेच्या औपचारिक व संघटित विभागाचाच अंगभूत भाग आहेत. नजीकच्या भविष्यकाळात अर्थव्यवस्थेचा हा औपचारिक व संघटित विभाग रूढ चाकोरीतून वाटचाल करीत राहूनच बेरोजगारीची समस्या सोडवू शकेल यावर पक्की श्रद्धा ठेवणे ही त्यांची मानसिक व भावनात्मक गरजच असावी असे दिसते. तसेच, त्यांची अशी पक्की धारणा आहे की, जी काही बेरोजगारी उरेल तिच्यावर तात्कालिक तोडगा म्हणून अशा बेरोजगारीचे दारिद्र्य काही प्रमाणात तरी निवारण करू शकणाऱ्या राहत (relief) योजना राबविता येतीलच येतील. हा भ्रम अजून दूर होत नाही, आणि पारंपरिक चाकोरीबद्ध आर्थिक विचाराला आवश्यक ते नवे वळण प्राप्त होण्याच्या आड हे भ्रमपटल येत आहे.

ग्रामीण पुनर्निर्माणाविषयीची एक वैकल्पिक संकल्पना मान्य होण्याची गरज आहे. मुख्यतः स्थानिक संसाधनांचाच वापर करून आणि मुख्यत्वेकरून निकडीच्या स्थानिक गरजांची पूर्तता करण्याच्या उद्देशाने स्थानिक पातळीवरील उपलब्ध वाढीव, अतिरिक्त श्रमशक्ती विविध उत्पादक कार्ये सुनियोजित पद्धतीने पार पाडीत आहे असे चित्र डोळ्यांसमोर उभे करावयास हवे. या गरजा जशा भौतिक असतील तशा सांस्कृतिकपण असतील. जेम्स रॉबर्टसन यांचे म्हणणे येथे उद्धृत करण्यासारखे आहे. ते म्हणतात, "एकविसाव्या शतकातील अर्थव्यवस्था ही स्थानिक जनसमूहांची अभिक्रमशीलता वाढवणारी, स्वतःच्या पायावर उभे राहून विविध स्वरूपाचा विकास साधण्याची त्यांची क्षमता वृद्धिंगत करणारी अशी असली पाहिजे; त्यांचे परावलंबित्व न वाढविता त्यांचे स्वाश्रयीपण वाढविण्याच्या अंगाने त्यांची पुष्टी करणारी असली पाहिजे." अर्थव्यवस्थेच्या औपचारिक संघटित विभागा-मध्ये बाजारयंत्रणा आणि राज्यसंस्था यांची भूमिका मध्यवर्ती राहते तर या दुसऱ्या विभागात जनसमूहांमधील परस्पर सहकार्य व स्वाश्रय यांना मध्यवर्ती भूमिका बजावता यायला हवी.

या प्रकारची पुनर्रचना घडवून आणण्यासाठी आपणांस तत्परता प्रकट केली पाहिजे. कारण आधीच उशीर झालेला आहे. पुढील सहस्रकाची गोष्ट लोक सवंगपणे करीत आहेत. एक सहस्रक हा फार दीर्घ कालावधी, नव्हे अतिदीर्घकालावधी म्हणता येईल. आपल्या अर्थव्यवस्थेची व समाजाची पुनर्रचना करण्यासाठी पुढील वीस ते तीस वर्षांचा कालावधी हाच निर्णायक महत्त्वाचा आहे. या कालावधीत पुनर्रचनेच्या दृष्टीने ठोस पावले पुढे पडायलाच हवीत. अर्थव्यवस्थेतील औपचारिक संघटित विभाग आणि अनौपचारिक असंघटित विभाग या दोन विभागांचे सहअस्तित्व आपणांस भविष्यकाळासाठी गृहीत धरायला पाहिजे.

अर्थव्यवस्थेच्या औपचारिक संघटित विभागाला जागतिक बाजारपेठेला सामोरे जावेच लागणार आहे ही गोष्ट स्वीकारली पाहिजे. परदेशी भांडवलाचे योग्य शर्तींवर स्वागत करण्याची भूमिका हीच येथे योग्य भूमिका ठरते. लोकशाहीचा आधार व आवश्यक आविष्कार या नात्याने कायदेकानूंचे काटेकोरपणे पालन करण्यावर या विभागामध्ये जोर द्यावा लागेल. कामचुकार संस्कृतीऐवजी कामसू वृत्ती व व्यवहार यांची संस्कृती जोपासायला हवी. साधनसंपत्तीचे अधिक चांगले व अनुरूप वाटप होण्याच्या दृष्टीने तसेच कार्यक्षमतेची आवश्यक ती अधिक उच्च पातळी साध्य करण्याच्या दृष्टीने जरूर तर 'एक्झिट पॉलिसी'चा अंगीकार करण्याची तयारी असली पाहिजे.

अर्थव्यवस्थेचा जो अनौपचारिक असंघटित विभाग असेल त्याचे वळण स्थानिक असेल. स्थानिक पातळीवर लोकांना जास्तीत जास्त उत्पादक रोजगार उपलब्ध करून देणे हे एक प्रमुख उद्दिष्ट असेल. दूरवरच्या बाजारपेठांमध्ये विकण्यासाठी

उत्पादने करण्यावर भर नसेल तर स्थानिक समुदायांच्या गरजांची पूर्तता करण्याला प्राथमिकता दिली जाईल. या विभागाची जी वरीलसारखी निर्धारित उद्दिष्टे आहेत ती साध्य करण्याच्या दृष्टीने तंत्रविज्ञानाच्या क्षेत्रात नवनवे शोध लावण्यावर व समुचित तंत्रविज्ञान (ॲप्रोप्रिएट टेक्नॉलॉजी) विकसित करण्यावर भर दिला जाईल. जातपात आणि पंथ, उपपंथ यांच्या तटबंद्या भेदून वा ओलांडून स्थानिक पातळीवर समुदायाची एकात्मता वाढीस लागेल व अर्थव्यवस्थेला एक समुदायनिष्ठ व्यक्तिमत्व प्राप्त होईल असे पाहिले जाईल. लोकांमध्ये परस्परांविषयी बंधुभाव वाढीस लागावा व त्या बंधुभावातून माणसांना सर्जनशील अभिव्यक्तीस अधिक मोकळीक व अवकाश प्राप्त व्हावा ही प्रेरणा क्रियाशील असेल. अशा प्रकारची समाजव्यवस्था वरून लादता येत नाही. तिची बांधणी लोकांच्या जाणत्या सहभागाच्या आधारे पायाभरणीपासून वर करीत न्यावी लागते.

सुदैवाने या दिशेने कार्यरत असलेल्या व्यक्ती आजच आपल्याला जागोजाग आढळून येतात. त्यांची एकूण संख्या आजच्या घडीला कमी आहे आणि प्रसारमाध्यमांचे त्यांच्याकडे फारसे लक्ष नाही. प्रसारमाध्यमे त्यांच्या कामाची योग्य ती दखल घेऊन त्यांना उठाव देत नाहीत हे खरे, पण त्यांची अव्यवहार्य आदर्शवादी (युटोपियन) म्हणून संभावना करून त्यांच्या कामाला निष्फळ, व्यर्थ ठरविणारे अश्रद्ध लोक आहेत ही गोष्टही खरी; पण या धडपडणाऱ्या व्यक्ती त्यांच्या पथदर्शक कार्याच्या द्वारे कोणती साध्ये गाठू शकतात यावर एकविसाव्या शतकातील मानवजातीचे भवितव्य अवलंबून आहे. हे पथदर्शक प्रयोग सफळ व्हावयाचे असतील तर शिक्षणाचे वळण बदलणेही प्राणभूत आवश्यक आहे. केवळ साक्षरतेवर भर देणारे शिक्षण पुरेसे नाही तर वैकल्पिक समाजव्यवस्था उभारण्याच्या दृष्टीने उपकारक व उपयोगी अशा कौशल्यांची आणि मनोवृत्तींची जोपासना करणारे, त्यांना बळकटी देणारे शिक्षण दिले जाण्याची गरज आहे.

मानवी सभ्यता संवर्धित होणार की ऱ्हास पावणार या प्रकारच्या पेचप्रसंगात आपण आज सापडलो आहोत. राष्ट्रांच्या संपत्तीमध्ये वाढ करण्यासाठी काय काय उपाय योजिले पाहिजेत याचा शोध घेतला पाहिजे. पण त्याही पलीकडील अनेक गोष्टी विचारात घेणे जरुरीचे बनले आहे. या पेचातून योग्य ती वाट काढण्याचे आव्हान पेलण्याच्या दृष्टीने आवश्यक ते नवे वळण अर्थशास्त्र (पोलिटिकल इकॉनॉमी) घेऊ शकते का हा आजचा यक्ष प्रश्न आहे. हे वळण जर अर्थशास्त्रज्ञ अर्थशास्त्राला देऊ शकले तर ती गोष्ट अर्थशास्त्राला एकविसाव्या शतकामध्ये बहुमान प्राप्त करून देणारी ठरेल.

●●

## लेखक परिचय


❖ **अम्लान दत्त** : अर्थशास्त्राचे नामवंत प्राध्यापक; नॉर्थ बेंगॉल युनिव्हर्सिटी व विश्वभारती (विद्यापीठ), शांतिनिकेतन,चे भूतपूर्व कुलगुरू; आर्थिक, शैक्षणिक, सामाजिक, राजकीय विषयांवर प्रबोधनपर विपुल लेखन; *पर्स्पेक्टिव्ह ऑफ इकॉनॉमिक डेव्हलपमेंट, सोशलिझम, डेमॉक्रसी ॲंड इंडस्ट्रियलायझेशन, द थर्ड मूव्हमेन्ट, द गांधीयन वे, बियाँड सोशलिझम* इ. ग्रंथांचे कर्ते. **पत्ता :** पूर्वपल्ली (उत्तर), शांतिनिकेतन ७३१ २३५, प. बंगाल.

❖ **नीरज हातेकर** : अर्थशास्त्रात डॉक्टरेट, मुंबई विद्यापीठात अर्थशास्त्र विषयाचे प्राध्यापक, गणिती अर्थशास्त्राचा तसेच एकोणिसाव्या शतकातील भारतीय अर्थकारणाचा विशेष अभ्यास.

❖ **रूपा रेगे-नित्सुरे** : अर्थशास्त्रात डॉक्टरेट, इंडस्ट्रिअल क्रेडिट इन्व्हेस्टमेंट कॉर्पोरेशन ऑफ इंडिया, मुंबई, या राष्ट्रीय पातळीवरील वित्तीय संस्थेत उच्चपदस्थ अधिकारी, वास्तव्य मुंबई येथे.

❖ **आ.ना. पेडणेकर** : इंग्रजीचे निवृत्त प्राध्यापक; लघुकथाकार, कवी व समीक्षक; टॉलस्टॉय यांच्या *वॉर ॲंड पीस* या अक्षर वाङ्मयकृतीचे संक्षिप्त भाषांतर *युद्ध आणि शांती* प्रसिद्ध. **पत्ता** : ६ अनुपमप्रभा, अमरसी रोड, मालाड (प.), मुंबई ४०० ०६४.

❖ **प्रभाकर नानावटी** : केंद्र सरकारच्या आर्मामेंट रिसर्च प्रयोगशाळेत नोकरी; बुद्धिप्रामाण्यवादी, विज्ञाननिष्ठ दृष्टिकोनामधून राजकीय-सामाजिक घडामोडींविषयी चिंतन; वृत्तपत्रीय लेखन. **पत्ता** : आर्मामेंट कॉलनी, औंध, पुणे ४११ ००७.

# एम.एन. रॉय यांचा राजकीय व आर्थिक विचार व सद्यःस्थितीतील भारत

नीरज हातेकर

– १ –

आजच्या जगातील अर्थव्यवस्थांचे वर्गीकरण करावयाचे झाल्यास 'भांडवलशाही' व 'समाजवादी' अर्थव्यवस्था असे करणे कदाचित सयुक्तिक होणार नाही. 'भांडवलशाही' व 'समाजवादी' या संज्ञा एखाद्या व्यक्तीस काय निर्देशित करतात हे बऱ्याच प्रमाणात ती व्यक्ती कोणत्या तत्त्वज्ञानाच्या बैठकीतून ह्या अर्थव्यवस्थांकडे बघते ह्यावर अवलंबून असते. मार्क्सवादी चष्म्यातून भांडवलशाहीचा अर्थ "जेथे श्रम आणि उत्पादनाची साधने ह्यांची मालकी वेगवेगळ्या गटांकडे असते (श्रमाची मालकी कामगारांकडे पण उत्पादनाची साधने भांडवलदारांच्या हातांत) आणि जेथे नफा हा अतिरिक्त उत्पादनमूल्यातूनच मिळवला जातो अशी अर्थव्यवस्था" असा लागतो. हा दृष्टिकोण असेही मानतो की, अशा प्रकारच्या अर्थव्यवस्थांचे काही मूलभूत आर्थिक नियमांच्या (उदा., नफ्याचा घटता दर) अंकित असणे अपरिहार्य असते. वास्तविक घटनांचा (उदा., औद्योगिक मंदी किंवा बेकारी) अर्थ ह्या नियमांच्या आधारेच लावला जातो. याउलट, उदारमतवादाच्या (Liberalism) दृष्टिकोणातून बघितल्यास 'भांडवली अर्थव्यवस्था' म्हणजे जेथे उत्पादनसाधनांची मालकी खासगी असते आणि "जेथे आर्थिक बाबतीत निर्णय व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारित असतात अशी अर्थव्यवस्था' हा होय. नक्की कितपत सरकारी हस्तक्षेप झाल्यावर अशी अर्थव्यवस्था निव्वळ भांडवलशाही न राहता इतर कोणते तरी स्वरूप घेते हे या व्याख्येत स्पष्ट होत नाही. 'समाजवादी अर्थव्यवस्था' ह्या संकल्पनेच्या बाबतसुद्धा कमीअधिक फरकाने आपल्याला असेच म्हणता येईल. उदा., क्रांतीनंतरची सोव्हिएट अर्थव्यवस्था ही खरोखरीच मार्क्सला अभिप्रेत असलेली 'समाजवादी' व्यवस्था होती काय? तसे नसल्यास कोणत्या अर्थाने तिला समाजवादी अर्थव्यवस्था म्हणता येईल? त्यामुळे 'भांडवलशाही' आणि 'समाजवाद' अशा स्वरूपाचे वर्गीकरण जरी तत्त्वज्ञानाच्या (Philosophical) पातळीवर मूलभूत असले तरी अनुभवजन्य (Empirical) पातळीवर आपणांस अर्थव्यवस्थांचे वर्गीकरण करण्यास वेगळे निकष शोधावे लागतील.

ह्या लेखात भांडवलशाहीची व्याख्या आपण 'सर्वसाधारणपणे साधनसामग्रीचे वाटप, वस्तू आणि सेवांचे उत्पादन व वितरण, मागणी व पुरवठा ह्या तत्त्वावर करणारी व्यवस्था' असे करूया. हे उत्पादन/वितरण, खाजगी व्यक्ती/सरकारी/सहकारी संस्थांमार्फत होऊ शकेल. ह्याउलट, ज्या व्यवस्थेत उत्पादन आणि वितरण, साधनसामग्रीचे विभाजन मागणी-पुरवठा तत्त्वावर न होता कोणत्यातरी संस्थात्मक रचनेकडून मिळणाऱ्या हुकमानुसार होते अशा व्यवस्थेला आपण राज्यसत्तेच्या आदेशाबरहुकूम चालणारी 'हुकुमी' अर्थव्यवस्था (Command Economy) असे म्हणू, तर भांडवली अर्थव्यवस्थेला आपण बाजाराधिष्ठित अर्थव्यवस्था (Market based Economy) असेही म्हणू शकतो.

भांडवलशाहीची वरील व्याख्या जर आपल्याला मान्य असेल, तर रॉय ह्यांना अभिप्रेत असणारी सहकारी अर्थव्यवस्था ही भांडवलशाहीचाच प्रकार म्हणावा लागेल. सोव्हिएट संघराज्यातसुद्धा सहकारी तत्त्वावर उत्पादनाची रचना केली गेली होती. (क्रांतिपूर्व रशियातसुद्धा सहकारी चळवळ चांगलीच रुजली होती.) सोव्हिएट रशियामध्ये कॉलकोझ (Kolkhoz) शेतांवरील शेतकऱ्यांना निव्वळ उत्पन्नाचा ठरावीक भाग दिला जात असे. (शिवाय त्यांना स्वतःचा असा लहानसा जमिनीचा तुकडा असे ज्याच्यावरील उत्पादन कौटुंबिक श्रमाने केले जात असे आणि खुल्या बाजारात विकता येत असे.) अशा प्रकारची सहकारी अर्थव्यवस्था रॉयना अभिप्रेत असलेल्या व्यवस्थेपेक्षा वेगळी कशी? कॉलकोझना सरकारला पुरवावयाच्या उत्पादनाचा कोटा ठरवून दिला जात असे आणि सरकारने ठरवून दिलेल्या किमतींना तो पुरवावाच लागत असे. याउलट, रॉयना अभिप्रेत असलेल्या सहकारी व्यवस्थेत कशाचे उत्पादन किती प्रमाणात करायचे आणि काय किंमतीला विकायचे हे खुल्या बाजारात ठरेल. म्हणजेच सोव्हिएट कॉलकोझ






हा प्रकार रॉय ह्यांना अभिप्रेत असलेल्या सहकारी अर्थव्यवस्थेपेक्षा मूलतः वेगळा असून कॉलकोझ व्यवस्थेला आपण 'हुकुमी' अर्थव्यवस्था म्हणालो तर रॉयच्या सहकारी व्यवस्थेला आपणांस भांडवलशाहीच्या व्याख्येप्रमाणे भांडवलशाहीचाच एक प्रकार म्हणावे लागेल. रॉय ह्यांची सहकारी अर्थव्यवस्था हा 'भांडवलशाही' व 'समाजवाद' ह्यांच्याहून वेगळा असा तिसरा मार्ग आहे हे म्हणणे तितकेसे योग्य वाटत नाही.

रॉय ह्यांनी 'भांडवलशाही' नाकारलेली नाही, तर भांडवलशाहीतील मक्तेदारी, आर्थिक विषमता इ. अनिष्ट प्रवृत्ती टाळणाऱ्या संरचनेवर त्यांचा भर दिसतो. अनेकविध लहान-लहान उत्पादकांनी अनेक उपभोक्त्यांसाठी स्पर्धात्मक तत्त्वावर व नफ्यासाठी उत्पादन केले तर अर्थव्यवस्थेतील सर्वांचे जास्तीत जास्त भले होते असे अर्थशास्त्रातील एक सिद्धान्त सांगतो. अशी अर्थव्यवस्था अधिकृत (official) अर्थशास्त्रात मूल्यात्मक मानली जाते. रॉय ह्यांना अभिप्रेत असलेल्या सहकारी अर्थव्यवस्थेचे स्वरूप वरील वर्णनात बसेल असेच आहे. रॉय ह्यांच्या मते सहकारी तत्त्वावर उत्पादन केल्याने व्यक्तिगत मालकी हक्कामुळे मक्तेदारी व क्रयशक्ती थोड्यांच्या हातात एकवटण्यासारख्या ज्या समस्या निर्माण होतात त्या निर्माण होणार नाहीत. म्हणजे स्पर्धात्मक भांडवली अर्थव्यवस्थेप्रमाणेच रॉय ह्यांची अर्थव्यवस्था असेल.

रॉय हुकुमी अर्थव्यवस्थेचा विरोध करतात. त्यांनी स्टॅलिनच्या आर्थिक हुकूमशाहीचे आणि नियोजित अर्थव्यवस्थेचे गंभीर परिणाम जवळून पाहिले होते. क्रांतीनंतर सोव्हिएट युनियनसमोर प्रगत भांडवलशाही राष्ट्रांइतका औद्योगिक विकास शक्य तितक्या त्वरेने कसा साधायचा असा प्रश्न होता. बाजारावर आधारित अर्थव्यवस्था नाकारल्यामुळे उत्पादकांकडून उपभोक्त्यांकडे वस्तू आणि सेवा कशा न्यायच्या हा प्रश्न होताच. त्याहीपेक्षा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे औद्योगिकीकरणासाठी लागणारी सामग्री कोठून मिळवायची असा होता. बाजारपेठेचे तत्त्वज्ञान नाकारल्यामुळे शेतकऱ्यांनी वैयक्तिक नफ्यासाठी औद्योगिक क्षेत्राला शेतीमाल पुरवण्याचा प्रश्नच नव्हता. १९१८-१९२० या 'वॉर कम्युनिझम'च्या कालखंडात शेतीमाल शेतकऱ्यांकडून जबरदस्तीने गोळा करून सैन्याला व शहरांना पुरविला जाऊ लागला. यात शेतकऱ्यांचे अतोनात हाल झाले. 'चेका'च्या (All Russian Extraordinary Commission for Fighting Counter-Revolution and Sabotage)च्या तुकड्या खेड्यांमध्ये जाऊन शेतकरी कुटुंबाच्या 'वैयक्तिक गरजेपेक्षा जास्त' असलेला कोणताही धान्याचा साठा जप्त करीत. 'गरीब खेडुतांच्या कमिट्या' नेमल्या गेल्या. ह्या कमिट्यांचे काम अन्नाचे 'छुपे साठे' शोधून काढणे हे होते. सरकारी यंत्रणा इतकी गोंधळलेली आणि विस्कळीत होती की, बंदी असूनही खासगी व्यापार - - धोका पत्करून - होऊ लागला.[१] त्यातच १९२१- २२ साली दुष्काळ पडला. या दुष्काळाला सरकारचे धान्यवसुलीचे धोरणसुद्धा बऱ्याच अंशी कारणीभूत ठरले. या दुष्काळात झालेल्या मानवी हानीचे खालील वर्णन अंगावर शहारे आणणारे आहे. "Sometimes, insensate mothers and fathers feed their children human meat as a last resort. Sometime a starving family eats the body of one of its junior members, sometime a father, seeing no other way, cuts the throat of a neighbour's child and brings it to his children as 'mutton'."[२]

ह्या भीषण दुष्काळाच्या परिणामी जप्तीच्या धोरणात थोडा बदल करून शेतकऱ्यांना कोटा ठरवून देण्यात आला. कोट्यापेक्षा अधिकचे उत्पादन बाजारात विकण्यास परवानगी देण्यात आली. पुढे कोटापद्धती रद्द करून ठरावीक रक्कम 'कर' म्हणून घेण्याचे ठरले. त्यामागील कल्पना अशी की, कर भरण्यासाठी शेतकऱ्यांना सरकारला धान्य विकावे लागेल व धान्याच्या किमती पुरेशा प्रमाणात कमी ठेवल्या तर प्रत्यक्ष वसुली न करताही शेतकऱ्यांकडून बरेचसे उत्पादन सरकारला स्वस्तात मिळू शकेल. सरकारच्या दुर्दैवाने मांसाच्या किमतीत धान्याच्या किमतीइतकी घट साध्य करता आली नाही. शेतकऱ्यांनी धान्य सरकारला न विकता गुरांना खायला घालायला सुरुवात केली. स्टॅलिन सत्तेवर आल्यानंतर काही काळ ही परिस्थिती टिकली. परंतु स्वतःचे राजकीय स्थान भक्कम केल्यावर स्टॅलिनने औद्योगिकीकरणाचा वेग वाढविण्याचे ठरविले आणि त्याबरोबरच शेतीचे सामुदायीकरण (collectivisation) करायला वेगाने सुरवात केली. खाऊनपिऊन सुखी असलेल्या मध्यम शेतकऱ्यांनासुद्धा 'कुलाक' ठरवून त्यांच्या जमिनी जप्त करण्याचा सपाटा सुरू झाला. १९२८ साली एकूण शेतजमिनीच्या केवळ तीन टक्के इतकी जमीन







अनुक्रमणिका

'कोल्कोझ' व सरकारी शेतीखाली होती. १९३० च्या मार्चमध्ये ५८ टक्के जमीन 'कोल्कोझ'खाली आणल्याचे स्टॅलिनने जाहीर केले. हा मधला काळ अत्यंत क्रौर्याचा म्हणावा लागेल. 'गरीब' शेतकऱ्यांना 'श्रीमंत' शेतकऱ्यांची घरे लुटण्याची परवानगी देण्यात आली. बऱ्याचशा 'कुलाक'ना ('कुलाक' म्हणजे नक्की कोण, हा प्रश्न तेव्हापण अवघडच होता. झारच्या राजवटीत सर्वसाधारण मध्यम आणि श्रीमंत शेतकरी, जे इतरांना पैसे कर्जाऊ देत, त्यांना कुलाक म्हणण्यात येत असे. १९२९ मध्ये 'विचारसरणीनुसार कुलाक' (Ideological Kulak), 'उपकुलाक' वगैरे प्रकार शोधून काढण्यात आले. गुलाग कॅम्पसवर किंवा सैबेरियात पाठविण्यात आले. या काळात सुमारे साठ लाख लोकांना त्यांच्या त्यांच्या गावांतून 'कुलाक' म्हणून हाकलून देण्यात आले असावे असा अंदाज आहे.[३] 'कुलाक'ना घेऊन जाणाऱ्या वाहनांची आणि प्रत्यक्ष प्रवासाची स्थिति कशी होती याचे वर्णन पाहा. "The old Party member E.M. Landau in 1930 met one of these batches in Siberia. In the depth of winter a big group of Kulak with their families was being taken on carts 300 Kilometers into the backwoods of the region. The children were shouting and crying from hunger. One of the peasants, who could no longer stand the cries of a baby sucking the dry breast of its mother, seized the infant from his wife's arms and smashed its head against a tree."[४]

रॉयना स्वत: नियोजनातील सत्ता-केंद्रीकरणाची झळ पोहोचली होती. त्यांच्यासमोर असलेल्या हुकुमी अर्थव्यवस्थेचे स्वरूप वरीलप्रमाणे होते. म्हणून समाजवादी अर्थव्यवस्थांमधील निर्णय सर्वसामान्यांनी मुक्तपणे व्यक्त केलेल्या गरजांनुसार ठरत नसतात तर इतर कोणतीतरी यंत्रणा त्यांच्यासाठी हे निर्णय घेत असते हे रॉय ह्यांना मानवी स्वातंत्र्याची पायमल्ली करणारे वाटले असावे.

रॉय ह्यांच्या समोर असलेल्या प्रश्नाचे नक्की स्वरूप आता आपल्याल स्पष्ट करता येईल : जर नियोजित अर्थव्यवस्था आणि व्यक्तिगत मालमत्तेवर आधारित भांडवलशाही या दोन्ही अर्थव्यवस्थांमध्ये आर्थिक सत्तेचे केंद्रीकरण झाल्याने सामान्य जनतेला आपल्याला हव्या असलेल्या सेवा व वस्तूंच्या मागणीचे प्रत्यक्ष उत्पादनात रूपांतर करणे शक्य नसेल तर अशी कोणती अर्थरचना असू शकेल की जीमध्ये आर्थिक सत्ता विकेंद्रित ठेवून व्यक्तिस्वातंत्र्याला बाध न येऊ देता लोकांच्या गरजा पूर्ण करता येतील?

रॉय ह्यांच्या मते सहकारी तत्त्वावर उभारलेली भांडवली अर्थव्यवस्था हा प्रश्न सोडवू शकेल. अशी भांडवलशाही अर्थातच पूर्णपणे अनियोजित असणार नाही. नियोजनाची सुरुवात स्थानिक पातळीवरून होईल. आठवडी बाजाराचे गाव व त्याच्या आसपासची खेडी इतक्या लहान पातळीवरून नियोजनाची सुरुवात करून 'खालून वर' नियोजन केल्यास सर्वसामान्य लोकांच्या गरजांची पूर्ती योग्य प्रकारे होऊ शकेल अशी आशा त्यांना वाटत होती. शेतीचा आर्थिक विकास झाल्यास शेतीक्षेत्राकडून होणारी औद्योगिक उत्पादनाची मागणी वाढेल. ही मागणी ग्रामीण भागात सहकारी तत्त्वावर लहान उद्योगधंदे सुरू करून भागवता येईल. मुख्य म्हणजे अशा व्यवस्थेत क्रयशक्ती ही मूठभरांच्या हाती एकवटणार नाही. त्यामुळे बाजारपेठांतून होणारा वस्तूंचा पुरवठा हा केवळ काही श्रीमंत लोकांच्या गरजांपुरता न राहता सर्वसामान्य लोकांच्या गरजांनुसार ठरला जाईल. उत्पादन हे केवळ नफ्यासाठी न होता प्राधान्याने उपभोगासाठी होईल असा रॉय ह्यांच्या विचाराचा मथितार्थ लावल्यास तो केवळ पोकळ आशावाद वाटत नाही. सहकारी अर्थव्यवस्थेतदेखील सहकारी कंपन्या नफ्यासाठी उत्पादन करतील; परंतु ही अर्थव्यवस्था पूर्णपणे स्पर्धात्मक असल्याने कोणत्याही एका कंपनीला भरघोस नफा कमाविता येणार नाही,[५] तसेच मक्तेदारीही वाढीस लागणार नाही. अशा अर्थव्यवस्थेत उत्पादनाच्या प्रत्येक घटकाला (ज्याचा पुरवठा सीमित असतो) त्याच्या उत्पादनातील सीमान्त योगदानाच्या इतकाच मोबदला मिळतो हा अर्थशास्त्रातील एक महत्त्वाचा सिद्धान्त आहे. उत्पादकसंस्था जरी नफ्याच्या प्रेरणेने उत्पादन करत असतील तरी उत्पादन हे सर्वसाधारण लोकांच्या मागणीनुसार होत असते. ('गरजा' म्हटले की, गरज म्हणजे काय हे कोणी ठरवायचे असा प्रश्न उपस्थित होतो.) कोणाही एका कंपनीला होणारा नफा हा अल्पकालीन व अल्प असतो. ही व्यवस्था सर्व प्रकारच्या अर्थशास्त्रीय विचारसरणीत आदर्श अशी मानली गेली आहे. या कल्पनेच्या तोडीचीच व वास्तवाला धरून असलेली अशीच रॉय ह्यांची कल्पना वाटते.

परंतु प्रचलित अर्थव्यवस्थेची रॉय ह्यांच्या संकल्पनेनुसार पुनर्रचना करावयाची झाल्यास साधनसामग्रीच्या वाटपात असलेली विषमता कमी करावी लागेल. जोवर साधनसामग्रीची मालकी काहींच्याच हाती एकवटलेली आहे, तोपर्यंत स्पर्धात्मक अर्थकारणाचा फायदा मालमत्ताधारी वर्गालाच होतो हादेखील तितकाच महत्त्वाचा आर्थिक नियम आहे. जमिनीचे फेरवाटप किंवा किमानपक्षी जमीनधारणेसंबंधीच्या कायद्यांची अंमल-बजावणी करण्यास आपण अयशस्वी ठरलो आहोत. सशस्त्र क्रांतीचे तुरळक लढेदेखील त्याच वाटेने चाललेले दिसतात. मग आर्थिक विषमतेवर राजकीय उपाय कोणता, तर आर्थिक साधनसामग्रीची मालकी नसलेल्या घटकांची राजकीय शक्ती वाढवणे हा की रॉय ह्यांना अभिप्रेत होता तो? मानव स्वभावतः विवेकशील आहे व ही विवेकशीलता हाच सुसंवादी समाजव्यवस्थेचा पाया होय.[६] आर्थिक दारिद्र्य, राजकीय जुलूम आणि सामाजिक अस्थैर्य असलेल्या वातावरणातदेखील परिस्थिती बदलण्याची इच्छा आणि सामर्थ्य निर्माण होऊ शकते. लोकांमधील स्वातंत्र्यलालसेच्या आधाराने त्यांच्यातील विवेक जागृत करून विषमता दूर करण्यासाठी त्यांचा राजकीय दबाव निर्माण करणे शक्य आहे. रॉय यांचे असे म्हणणे होते. एकविसाव्या शतकात भारताला रॉय ह्यांचे विचार कितपत उपयुक्त ठरू शकतात याचा विचार आपण लेखाच्या पुढील भागात करणार आहोत.

– २ –

आपल्या देशातील सध्याच्या अर्थव्यवस्थेचे वर्णन बऱ्याच अंशी 'भांडवलशाही अर्थव्यवस्था' (अर्थात भाग १ मध्ये मांडलेल्या भांडवलशाहीच्या व्याख्येनुसार) असे करता येईल. १९९१ नंतर सुरू झालेल्या जागतिकीकरणाच्या प्रक्रियेत सार्वजनिक क्षेत्राच्या खासगीकरणाला वेग आला. खासगी क्षेत्राला मज्जाव असलेली अनेक उत्पादनाची क्षेत्रेसुद्धा आता खासगी क्षेत्रासाठी खुली करण्यात आली आहेत. भांडवल-शाहीकडे होत असलेल्या वाटचालीचे आणखी एक गमक म्हणजे सार्वजनिक पातळीवर होत असलेला विचारप्रवाहातील बदल. १९८० च्या दशकाअखेरपर्यंत तोंडदेखलेपणे का होईना पण राजकीय पक्षांना धोरणात्मक पातळीवर कसलातरी समाजवाद जाहीररीत्या मानावा लागत असे. आर्थिक विकास हा सर्व घटकांना बरोबर घेऊन व्हावा, आर्थिक विषमता फार वाढू नये, हा सर्वसाधारण विचार केंद्रभूत मानला जात होता. त्यासाठी आर्थिक विकासावर सरकारचे नियंत्रण असावे, काही राष्ट्रीय उद्दिष्टे डोळ्यांसमोर ठेवून आर्थिक प्रक्रियांचे नियोजन व्हावे ह्यावर एक सर्वसम्मती (consensus) राष्ट्रीय पातळीवर होती.

दुर्दैवाने, भारताच्या राजकीय विकासाची प्रक्रिया मात्र ह्या कल्पनांना छेद देणारी ठरली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या लगेचच्या काळात राजकीय प्रक्रिया जनतेत पुरती रुजली नव्हती. परिणामी अनेक पातळ्यांवर विविध हितसंबंधांचे प्रतिनिधित्व असलेले स्पर्धात्मक राजकारण तेव्हा अस्तित्वात नव्हते. किंबहुना तसे ते कधीकाळी अस्तित्वात येईल ह्याची कल्पनाही चौकट निर्माण करणाऱ्या समाजधुरिणांना असल्याचे दिसत नाही. या परिस्थितीत काँग्रेस पक्षाची एकछत्री सत्ता आणि आर्थिक बाबीत निर्णय घेण्यात एका लहान एकसंध गटात असलेली एकवाक्यता यामुळे सरकारी नियोजनातून आर्थिक विकास साधता येईल असे वाटणे स्वाभाविकच होते.

स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीच एम.एन. रॉय ह्यांनी सरकारी नियोजनातील संभाव्य राजकीय अडथळ्यांची कल्पना दिली होती. सत्तासंपादनाच्या स्पर्धेत मतांचा अनुनय करणारे राजकीय पक्ष सर्वसामान्यांच्या खऱ्या प्रश्नांकडे लक्ष देऊ शकणार नाहीत असे रॉय ह्यांना वाटत होते. जसजशी संसदीय लोकशाही भारतात रुजू लागली आणि सामान्य जनतेचा राजकीय अनुभव वाढू लागला, तसतसे राजकारण अधिकाधिक स्पर्धात्मक होऊ लागले. स्पर्धात्मक राजकारणाची तीव्रता वाढू लागली की, साधनसामग्रीच्या वाटपावर अधिकाधिक दबाव येऊ लागतो. सरकारचे नियंत्रण असलेल्या अर्थव्यवस्थेत साधनसामग्रीच्या वाटपावर ताबा मिळविण्याचे साधन म्हणजे राजकीय प्रक्रियेवर ताबा असे समीकरण तयार होऊ लागते. सत्ताधारी पक्ष आपल्याकडे असलेल्या साधनसामग्रीच्या वाटपाचा अधिकार आपली सत्ता टिकविण्यासाठी वापरायला सुरुवात करतो. परिणामी साधनसामग्रीचे वाटप तत्कालीन राजकीय दबाव आणि राजकीयदृष्ट्या सक्षम लोकांचे गट ह्यांच्याकडून ठरविले जाऊ लागते. दीर्घकालीन नियोजनाचा बळी जातो. भारतात नियोजन मंडळांच्या घटत गेलेल्या महत्त्वामागे हे प्रमुख कारण आहे. एकगठ्ठा मते मिळवून देऊ शकणाऱ्या दबावगटांकडे साधनसामग्री वळवली जाते. आणि ज्यांच्यासाठी कोणतेही दबावगट आपोआप तयार

अनुक्रमणिका






होत नाहीत अशा सर्वसामान्यांच्या मूलभूत गरजा दुर्लक्षिल्या जातात. कोणताही बदल घडवायचा झाल्यास राज्ययंत्रणेवरील ताबा ही त्यासाठी प्राथमिक गरज बनते व त्यामुळे सत्ता मिळविण्यासाठी काहीही करायची तयारी होते. साधन हेच साध्यरूप बनते, आणि साध्याचा विसर पडतो.[८]

ह्याचा अर्थ असा नव्हे की, संसदीय लोकशाहीत सर्वसाधारण जनतेच्या आकांक्षा सत्ताधारी पक्षापर्यंत पोहोचतच नाहीत. स्वातंत्र्योत्तर भारतात दुष्काळात मोठी प्राणहानी न होण्याचे श्रेय बऱ्याच अंशी भारतीय संसदीय लोकशाहीला द्यावे लागेल.[९] स्पर्धात्मक संसदीय लोकशाहीमध्ये अशा वेळेला येणारे अनेक राजकीय दबाव सत्ताधारी वर्गाला योग्य ती पावले उचलण्यास भाग पाडू शकतात. याउलट, लोकशाही दबाव नसलेल्या चीनमध्ये १९५८-६१ साली पडलेल्या दुष्काळात अडीच-तीन कोटी माणसे मृत्युमुखी पडली व मुळात दुष्काळ पडला हेच सरकारला समजण्यास फार उशीर झाला.

ह्याचा अर्थ रॉय ह्यांनी संसदीय लोकशाहीच्या कमकुवतपणाची अतिशयोक्ती केली आहे असाच लावला पाहिजे. मतांसाठी जनतेचा अनुनय करणारे राजकीय पक्ष सर्वसाधारण लोकांच्या गरजांबाबत संवेदनशील होतील, परंतु त्यासाठी त्यांना तसे होण्याची राजकीय गरज भासायला हवी. तसे झाल्याची उदाहरणे मोजकी हा होईनात, पण भारतात दाखविता येतात. केरळमध्ये सर्वसामान्यांना सार्वजनिक आरोग्यविषयक व शिक्षणाच्या सुविधा पुरविण्यात संसदीय निवडणुकीच्या राजकारणाचा मोठाच वाटा आहे. सध्या केरळमधील सर्वसाधारण आयुर्मान ७२ वर्षे आहे. ८७ टक्के महिला व ९४ टक्के पुरुष साक्षर/शिक्षित आहेत. ९७ टक्के खेड्यांमध्ये वैद्यकीय सोयी आहेत. १९८६-८७ साली केरळमध्ये सार्वजनिक वितरण व्यवस्थेतून दरडोई ६० किलो अन्नधान्याचे वाटप करण्यात आले. त्याच वर्षी अखिल भारतीय पातळीवर हे प्रमाण १८.१ किलोग्रॅम इतके कमी होते.

हे सर्व शक्य होण्यास एका विशिष्ट स्वरूपाचा राजकीय दबाव महत्त्वाचा ठरला. केरळमध्ये एकूणच राजकीय चळवळीची वाढ शिक्षण व आरोग्यविषयक सोयी केंद्रीभूत मानून झाली आहे. (ह्याउलट, आर्थिक विकासाकडे दुर्लक्षच झाले आहे. १९८०-१९९० ह्या काळात केरळच्या उत्पन्नाच्या वाढीचा वेग फक्त ०.३ टक्के इतकाच होता. केरळमधील सशक्त कामगारचळवळीमुळे केरळमध्ये खासगी क्षेत्रातील गुंतवणुकीचे तुलनात्मक प्रमाणही कमीच आहे.) तसेच पश्चिम बंगाल व आंध्रप्रदेशातसुद्धा जमीनधारणेविषयी आणि सार्वजनिक वितरणव्यवस्थेविषयीचे मुद्दे सतत राजकीय चर्चेत असल्यामुळे ह्या राज्यांत कमाल जमीनधारणा कायद्यात आणि सार्वजनिक वितरणव्यवस्थेत बऱ्याच सुधारणा झालेल्या आहेत. कमीत कमी वरील राज्यांमध्ये तरी रॉय ह्यांची संसदीय लोकशाहीविषयीची टीका लागू पडत नाही.

याउलट, मध्यप्रदेश, राजस्थान, बिहार, उत्तर प्रदेश, ओरिसा ही राज्ये रॉय ह्यांच्या म्हणण्याचा जिवंत पुरावा म्हणून दाखविता येतील. उत्तर प्रदेशात १९९१ साली झालेल्या जन्मांपैकी फक्त ४ टक्के जन्म वैद्यकीय संस्थांमध्ये झाले. १९८७ साली सार्वजनिक वितरणव्यवस्थेतून कडधान्याचा सवलतीच्या दराने पुरवठा होणाऱ्या जनतेचे प्रमाण एकूण लोकसंख्येच्या फक्त ३ टक्के इतके कमी होते. १९९१ साली उत्तर प्रदेशात इस्पितळावरील खाटांची उपलब्धता दर १० लाख लोकसंख्येमागे ३४० इतकी कमी होती. ग्रामीण राजस्थानात महिलांच्या साक्षरतेचे प्रमाण २० टक्के इतके. राजस्थान आणि बिहारमध्ये दलित स्त्रियांपैकी ९० टक्क्यांपेक्षाही अधिक महिला निरक्षर आहेत. बिहारमध्ये दर हजार पुरुषांमागे फक्त ९११ महिला आहेत. मध्यप्रदेशात बालमृत्यूचा दर केरळच्या दहापट आहे.

ह्या फरकाचे प्रमुख कारण म्हणजे ह्या राज्यांतील राजकीय चळवळ फार काळ उच्चवर्गीय व उच्चवर्णीय लोकांच्या हातात होती हे आहे. ही मंडळी बऱ्याच अंशी राज्यसत्तेची राबवणूक स्वत:चा फायदा करून घेण्याकडे व शोषण अधिक तीव्र करण्याकडे करीत गेली.

वरील अनुभवावरून रॉय ह्यांचा संसदीय निराशावादाचा सिद्धान्त थोड्याफार शास्त्रीय पद्धतीने आपण येथे मांडू शकू. "संसदीय राजकारणाचा फायदा समाजातल्या संख्येने कमी असलेल्या अभिजनवर्गाला होतो की, सर्वसाधारण जनतेला हे त्या भागातील उत्पन्नाच्या साधनांचे वाटप (खास करून त्यामधील विषमता), जातिव्यवस्थेचे आणि त्या भागातील सामाजिक चळवळीचे स्वरूप तसेच राजकीय चळवळींची ऐतिहासिकता ह्या गोष्टींवर ठरेल". उत्पादनसाधनांचे वाटप, जातिव्यवस्थेचे स्वरूप आणि वरील व्याख्येत मांडलेले इतर निकष हे परस्परावलंबी असू शकतात, किंबहुना तसे ते असतातही. उदा., पश्चिम महाराष्ट्रातील विशिष्ट नैसर्गिक

परिस्थिती आणि गेल्या दोन शतकांचा इतिहास ह्यांनी येथे एक विशिष्ट सामाजिक आणि आर्थिक रचना निर्माण केली. ऐतिहासिक परिस्थितीने निर्माण केलेल्या उलथापालथीची परिणती येथे प्रवोधनयुगात झाली. १८१८ मध्ये पेशवाईचा पाडाव झाल्यावर अवघ्या चौदा वर्षांत येथे प्रबोधनयुगाची सुरुवात 'दर्पण'ने केली असे मानले जाते. इतक्या अल्प कालावधीत प्रबोधन होत नाही हे उघड आहे. अठराव्या शतकातील वेगवेगळ्या गटांना उपलब्ध असलेल्या संधी, त्यामुळे लोकसमूहांचा सततचा बदलणारा सामाजिक दर्जा, त्यातूनच उत्पन्न होणारे संघर्षाचे वातावरण ह्या सर्व गोष्टी प्रबोधनाला पोषक ठरल्या. इथल्या राजकारणालाही त्यामुळे वेगळे वळण मिळाले आणि ह्या विशिष्ट प्रकारच्या राजकीय दबावांमुळे येथे एक वैशिष्ट्यपूर्ण अर्थव्यवस्था उभी राहिली. याउलट, उत्तर प्रदेशच्या पूर्व भागातील ऐतिहासिकता वेगळी ठरल्यामुळे तेथील अर्थकारण आज वेगळे आहे.

संसदीय राजकारणात होणारी मानवी स्वातंत्र्याची पायमल्ली आपल्याला बिहार, राजस्थान, उत्तर प्रदेश वगैरे राज्यांच्या अनुभवावरून समजावून घेता येईल. रॉय ह्यांच्या मते [आणि जॉन स्टुअर्ट मिल्ल ते अमर्त्य सेन ह्यांच्यापर्यंतच्या उदारमतवादी (Liberal) तत्त्वज्ञांच्या मते] व्यक्तीच्या ठिकाणी वसत असलेल्या बौद्धिक, नैतिक आणि सर्जनशील सुप्त शक्तींच्या आविष्कारावरील भौतिक, सामाजिक व मानसिक बंधने नाहीशी होत जाणे म्हणजेच स्वातंत्र्य होय.[१०] अमर्त्य सेन ह्यांच्या मतेसुद्धा मानवाची क्षमता (capability) म्हणजे व्यक्तीसमोर (समूहासमोर नव्हे) तिला निवडता येतील असे पर्याय उपलब्ध असणे. स्वातंत्र्याचा विकास म्हणजे अशा पर्यायांच्या संख्येत वाढ होत जाणे. दारिद्र्यामुळे व्यक्तीपुढे असलेल्या पर्यायांवर मर्यादा येते म्हणून दारिद्र्य हे केवळ आर्थिक दौर्बल्य नसून व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर येणारी मर्यादा आहे.

सेन ह्यांच्या दृष्टिकोणातून आर्थिक विकासाचे प्रमुख ध्येय हे व्यक्तीसमोर असलेल्या आणि तिला निवड करता येईल अशा पर्यायांची संख्या वाढविणे हेच असायला हवे. म्हणूनच बिहार, उत्तर प्रदेश वगैरे राज्यांत संसदीय लोकशाहीच्या अपयशातून मानवी स्वातंत्र्याची पायमल्ली झाली आहे. तर केरळसारख्या राज्यांमध्ये विशिष्ट परिस्थितीमुळे संसदीय लोकशाहीतून मानवी स्वातंत्र्याची वाढ झाली आहे असे म्हणावे लागेल.

रॉय ह्यांची अपेक्षा राजकीय प्रक्रियेने जनतेत स्वातंत्र्य-लालसा जागृत करावी अशी आहे. जनतेच्या ठिकाणी स्वावलंबनाची वृत्ती निर्माण करून आपल्या भवितव्याचे आपणच निर्माते होऊ शकतो असा आत्मविश्वास वाढवावा लागेल. मानव मूलतःच बुद्धिवान प्राणी असून त्याला स्वातंत्र्यलालसा आहे, हा उदारमतवादी (Liberal) दृष्टिकोण रॉय मानतात. समाजाचे मूळ घटक ज्या व्यक्ती, त्यांना व्यक्तिशः मौलिक स्वातंत्र्याचा प्रत्यक्ष उपभोग घेता यावा याकरिता कशाची गरज आहे हे लक्षात घेऊनच राजकीय चळवळी उभाराव्या लागतील असेही रॉय मानतात. व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाच्या संपूर्ण विकासाच्या आड येणारी आर्थिक, सांस्कृतिक इ. सर्व कृत्रिम बंधने अधिकाधिक प्रमाणात दूर करत जाणे हाच रॅडिकल मानवतावादी आंदोलनाचा मूलभूत कार्यक्रम राहिला पाहिजे असे रॉय म्हणत. वर पाहिल्याप्रमाणे अमर्त्य सेन यांच्या मतेसुद्धा आर्थिक विकासामागील मूळ प्रेरणा ही अशीच असायला हवी. रॉय ह्यांचा कार्यक्रम अमर्त्य सेन यांना अभिप्रेत असलेल्या आर्थिक विकासाच्या प्रक्रियेशी सुसंगत आहे असेच म्हणावे लागेल.

आपण वर पाहिलेच आहे की, रॉय ह्यांचा संसदीय निराशावादाचा सिद्धान्त थोडासा अतिरंजित आहे. योग्य राजकीय दबाव निर्माण झाल्यास संसदीय लोकशाहीत मानवी स्वातंत्र्याचा विकास होऊ शकतो हे मान्य करावे लागेल. मानव मूलतः बुद्धिमान आहे, व त्याची स्वातंत्र्यलालसा जागविणारे राजकारण शक्य आहे असे सांगून रॉय ह्यांनी स्वतःच आपल्याला आशेचा किरण दाखविला आहे.

सर्वसामान्य जनतेच्या क्षमता (capabilities) (सेन ह्यांच्या व्याख्येनुसार) वाढविण्यात ज्यांना रस असेल अशा सर्व घटकांनी एकत्रितपणे मतांचे राजकारण करून राजकीय दबाव निर्माण केल्यास मानवी स्वातंत्र्याचे उद्दिष्ट साध्य होऊ शकते. अर्थात रॉय म्हणतात त्याप्रमाणे हे राजकारण पक्षीय नसेल. प्रत्येक पक्षाला आपली ऐतिहासिकता असते आणि त्यामुळे वंचितांचे राजकारण प्रामाणिकपणे करण्यावर पक्षीय राजकारणात बंधने पडतील हे रॉय ह्यांचे म्हणणे निर्विवाद खरे आहे. येथे अभिप्रेत असलेली चळवळ पक्षीय कार्यक्रमांच्या पलीकडे जाणारी असेल. समाजातील वंचित घटकांविषयी सहानुभूती असलेल्या सर्वांना पक्षीय अभिनिवेश सोडूनच एकत्रितपणे मतांचे राजकारण करावे लागेल.

भारतात जागतिकीकरणाची आणि 'उदार' आर्थिक धोरणांची प्रक्रिया सुरू झाल्यावर तर अशा स्वरूपाचे राजकारण (ज्याला आपण वंचितांचे राजकारण म्हणू या.) अपरिहार्य ठरणार आहे. जागतिकीकरण आणि 'उदार' आर्थिक धोरणांची सुरुवात झाली त्या वेळी ही धोरणे समाजवादाच्या नावाखाली स्वतःच्या हातात अमर्याद साधनसामग्री व सत्तासाधने एकवटलेल्या नोकरशहा, बडे भांडवलदार, मोठे शेतकरी ह्यांना शह देतील असे वाटले होते. सरतेशेवटी भारतातल्या मोठ्या भूभागात आर्थिक आणि सामाजिक मागासलेपण तथाकथित समाजवादी आर्थिक रचनेतच निर्माण झाले हे विसरता कामा नये. दुर्दैवाने भारतात सध्या तरी जागतिकीकरणाचे फायदे बहुतांशी उपरोक्त घटकांनाच मिळताना दिसत आहेत. उदा., खते, वीज, पाणी ह्यांवर मिळणाऱ्या सवलती, भारतीय उद्योगपतींना परदेशी स्पर्धेपासून वाचविण्यासाठी आणलेले आयातीवरील निर्बंध अशांसारख्या निर्णयांमुळेच मोठ्या प्रमाणात तुटीचा अर्थपुरवठा, खर्चिक औद्योगिक उत्पादन आणि तोकडी व अस्पर्धात्मक निर्यात असे समग्रलक्षी असमतोल १९९१ पूर्वी तयार झाले होते. ह्या असमतोलांची परिणती खुली अर्थव्यवस्था स्वीकारायला भाग पाडण्यात झाली. परंतु खुल्या अर्थव्यवस्थेचे फायदेही वरील गटांनाच मिळणार असे आता दिसते आहे. शेतीमालाची आयात-निर्यात खुली व्हावी म्हणून मोठे शेतकरी शरद जोशींच्या नेतृत्वाखाली आग्रही आहेत. याउलट, सार्वजनिक क्षेत्रातील शिक्षण, आरोग्य, रोजगारनिर्मिती ह्यांवरील वास्तविक खर्चात घट झाल्याने लहान शेतकरी, भूमिहीन शेतमजूर, आदिवासी, महिला, साधारण औद्योगिक कामगार ह्यांच्यावर विपरीत परिणाम दिसून येत आहेत. एवढेच नाही तर सध्या तरी धोरणात्मक चर्चांमधून वंचित घटकांच्या समस्यांची जाणीव कोठेच दिसत नाही. आज आर्थिक धोरणविषयक चर्चांवर खासगी औद्योगिक क्षेत्राचा पूर्ण ताबा दिसत असून जागतिकीकरण व खुले आर्थिक धोरण म्हणजे उत्पादकतेच्या नावाखाली खासगीकरण, स्वेच्छानिवृत्ती, कामगार कायद्यातून मिळणाऱ्या संरक्षणात कपात असेच समीकरण केले जात आहे. या प्रक्रियेचा ज्यांना प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष असा फायदा होतो त्यांचीच मालकी ज्ञाननिर्मितीच्या सर्व माध्यमांवर असल्यामुळे ह्या घटकांनी स्वतःपुरते खरे असलेले गोड गुलाबी चित्र हे सर्व भारतीयांचेच म्हणून खपवायला सुरुवात केली आहे. उदा., भारताला माहिती तंत्रज्ञानाचे माहेरघर म्हणून रंगवणारे ह्या देशातील अर्धी जनता पूर्णपणे निरक्षर आहे आणि उर्वरित बहुतेकांना फक्त अत्यंत सुमार दर्जाचे प्राथमिक शिक्षण जेमतेम मिळालेले आहे हे सोईस्करपणे विसरतात. भारत आर्थिक महासत्ता होण्याच्या मार्गावर (खरे तर थोडे भारतीय आंतरराष्ट्रीय श्रीमंतांच्या यादीत बसण्याच्या मार्गावर आहेत एवढेच) आहे असे वाटणाऱ्या ह्या घटकांकडून येथील वंचित समाजासाठी काही होईल अशी अपेक्षा करणे फोल ठरेल. म्हणूनच वंचित घटकांविषयी सहानुभूती असणाऱ्या सर्वांनी (कामगार चळवळ, दलित चळवळ, विचारवंत, महिला संघटना) एकत्रितपणे ह्या वंचित घटकांमध्ये स्वभावतःच असलेल्या बुद्धिप्रधानतेला आवाहन केले पाहिजे. त्यांच्यापुढे असलेल्या अत्यंत सीमित पर्यायांची त्यांना जाणीव करून देऊन त्यांची स्वातंत्र्यलालसा जागविली पाहिजे. म्हणजे वंचितांच्या गरजांसाठी एकत्र आघाडी उघडून मतांचे राजकारण केले पाहिजे. हे राजकारण मतांतेच असेल; कारण संसदीय लोकशाहीच्या बाजारपेठेत तेच एक चलनी नाणे चालते. हा संघर्ष मार्क्सवादासारख्या विशिष्ट धोरणांबाबत आग्रही असणाऱ्या तत्त्वज्ञानावरपण चालणार नाही. सर्व घटकांना एकत्रितपणे समान कार्यक्रम आखावा लागेल. हा कार्यक्रम बाजाराधिष्ठित अर्थव्यवस्थेचा विरोध करणारा नसावा; कारण बाजाराधिष्ठित अर्थव्यवस्थेला असलेले सरकारी हस्तक्षेपासारखे पर्याय बऱ्याचदा बाजार-व्यवस्थेपेक्षाही जास्त विषमता व अन्याय निर्माण करणारे असू शकतात. बाजारपेठेतून निर्माण होणाऱ्या विकासाच्या संधी सर्व घटकांना समानतेने उपलब्ध व्हाव्यात यासाठी पावले उचलण्यास सरकारला भाग पाडणे आवश्यक आहे. हा समान कार्यक्रम सध्याइतका मर्यादित असला तरी चालेल. उच्च दर्जाचे प्राथमिक शिक्षण, पुरेशा आरोग्यसुविधा, स्वच्छ पाणी, स्वच्छतागृहे इ. मूलभूत सुविधा लोकांना पुरवण्यास सरकारला भाग पाडले तरीसुद्धा वास्तविक पातळीवर बराच बदल होऊ शकेल. जागतिकीकरणाला विरोध करण्याचे नकारात्मक राजकारण (जे आता तसेही कालबाह्य झालेले आहे) करण्यापेक्षा वरीलप्रमाणे सकारात्मक राजकारण केल्यास सर्वसामान्य जनतेच्या स्वातंत्र्याच्या कक्षा रुंदावता येतील.

●●

# रॉयवादी आर्थिक विचार आणि भारतीय अर्थव्यवस्थेचे स्वरूप

रूपा रेगे-नित्सुरे

भारतीय अर्थव्यवस्थेचे सध्याचे स्वरूप खुल्या अर्थव्यवस्थेचे आहे. १९९१ सालापासून भारतीय शासनाने खुल्या आर्थिक धोरणांचा स्वीकार केला.

१९४७ साली जेव्हा भारत स्वतंत्र झाला त्या वेळी भारतीय अर्थव्यवस्था दुसरे महायुद्ध व फाळणी ह्यांच्या विपरीत परिणामांमुळे खिळखिळी झाली होती. भक्कम प्रशासकीय व राजकीय सुव्यवस्था निर्माण करणे व आर्थिक वाढीचा दर वाढविणे ही राज्यकर्त्यांपुढील महत्त्वाची आव्हाने होती. ही उद्दिष्टे पूर्ण करण्यासाठी भारतीय राज्यकर्त्यांनी पंडित नेहरूंच्या नेतृत्वाखाली समाजवादी तत्त्वांचा स्वीकार केला. अविकसित, वसाहतवादी अशा देशाला औद्योगिकदृष्ट्या समर्थ बनविण्याची प्राथमिक जबाबदारी शासनाने उचलली. त्याकरता आवश्यक असलेले भांडवल हे मुख्यत्वे क्रमवर्धी (progressive) करांमार्फत व कर्जे उभारून गोळा केले गेले. ह्यांतून मूलाधार उद्योग (basic industries) व आधारभूत संरचना (infrastructure) निर्माण करण्यांचे प्रयत्न होत होते. शासकीय प्रयत्नांना हातभार लावण्याच्या दृष्टीने खासगी उद्योगांना उत्तेजन दिले जात होते. मात्र या खासगी उद्योगांनी काय प्रकारचे उत्पादन करावे व कोणत्या उद्योगांत किती प्रमाणात गुंतवणूक करावी ह्याचे नियमन शासन करत होते. भारतीय अर्थव्यवस्थेने इतर देशांवर जास्त प्रमाणात अवलंबून राहू नये म्हणून तयार वस्तूंच्या तसेच कच्च्या मालाच्या आयातींवर अनेक निर्बंध लावण्यात आले होते. आयात पर्यायास (import substitute) उत्तेजन दिले होते. परिणामी भारतीय अर्थव्यवस्था अधिकाधिक संकुचित, संरक्षित व विनियमित बनत गेली. भारताला आर्थिकदृष्ट्या समर्थ बनविण्याच्या प्रक्रियेत अनेक नैसर्गिक आपत्ती (दुष्काळ, पूर इत्यादी) व मानवनिर्मित अरिष्टे (युद्धे, तेलकिंमतीमधील भरमसाठ वाढ) येत गेली.

ढोबळमानाने तरीदेखील आर्थिक स्तरावर भारतीय प्रगती समाधानकारकच मानावी लागेल. जवळजवळ एका शतकासाठी आर्थिक वाढीचा दर प्रतिवर्ष शून्य असलेल्या देशाच्या स्वातंत्र्योत्तर काळातील पहिल्या तीन दशकांसाठी सरासरीने प्रतिवर्ष वाढीचा दर ३.४ ते ४.९% एवढा असणे हे लक्षणीयच मानावे लागेल. १९८०च्या दशकात तर हा दर सरासरीने ५.८% एवढा होता. मात्र १९८०च्या दशकात अर्थव्यवस्थेत निर्माण झालेले काही गंभीर स्वरूपाचे संरचनात्मक असमतोल हळूहळू लक्षात येऊ लागले होते. ह्या असमतोलांची अनेक कारणे होती. संरचनात्मक अलवचिकता (structural rigidities), स्पर्धात्मक वातावरणाचा अभाव, सार्वजनिक क्षेत्रात बोकाळलेला भ्रष्टाचार व उद्योगांची अकार्यक्षमता, राजकोषीय शिस्तीचा अभाव (fiscal indiscipline) आणि उत्पादकतेच्या वाढीसाठी आवश्यक असलेल्या प्रेरकांचा (incentives) अभाव अशी अनेक कारणे देता येतील. ह्या दशकातील आर्थिक वाढ ही प्रामुख्याने सरकारी व्ययामधून होती. परिणामी राजकोषीय तुटीचे (fiscal deficit) आंतर्देशीय उत्पन्नाशी असलेले गुणोत्तर ४.०% पासून ८.३३% पर्यंत, १९७० ते १९९१ ह्या २१ वर्षांच्या काळात वाढले. मुख्य प्रश्न हा केवळ राजकोषीय तुटीचा नसून महसुलातील तुटीचा (Revenue deficit) होता. महसुलातील तुटीमधून उत्पादनाच्या साधनांची निर्मिती होत नसल्यामुळे हा व्यय सरकारी तिजोरीवरील निव्वळ बोजा ठरला होता. वाढती राजकोषीय तूट भरून काढण्यासाठी परदेशामधून येणाऱ्या गंगाजळीची गरज निर्माण झाली होती. ह्यामुळे विदेशी ऋणाचा बोजा वाढत चालला होता व ह्या ऋणाचा फार मोठा भाग हा कमी मुदतीच्या ऋणाने व्यापला होता. भारताच्या आर्थिक स्वायत्ततेच्या दृष्टीने हा फारच मोठा धोका निर्माण झाला होता. १९९१ सालातील आखाती युद्धानंतर आंतरराष्ट्रीय व्यवहारातील ताळेबंदाची परिस्थिती बिघडली व विदेशी चलनाचा साठा झपाट्याने आटत चालला. परिणामी भारतीय राज्यकर्त्यांना जागतिक बँक व आंतरराष्ट्रीय नाणेनिधीच्या साहाय्याने आर्थिक सुधारणांचा प्रकल्प हाती घ्यावा अशी आर्थिक स्थिती खरोखरच विकट बनली होती. अनेक प्रकारच्या लादलेल्या निर्बंधांमुळे व नियमनांमुळे भ्रष्टाचार बोकाळला

अनुक्रमणिका






होता, अकार्यक्षमता वाढली होती व भटकजीवींचा (rentiers) मोठा वर्ग उदयाला आला होता.

१९९१ नंतर भारताने मोठ्या प्रमाणात खुल्या आर्थिक धोरणांचा स्वीकार केला (काही प्रमाणात ह्या दृष्टीने प्रयत्न १९८५ सालापासूनच सुरू झाले होते.) परिणामी उत्पादन, गुंतवणूक व किमतींवरील निर्बंध हळूहळू शिथिल करण्यात आले. वाजाराभिमुख अर्थव्यवस्थेचा स्वीकार केला गेला. देशांतर्गतच नव्हे तर जागतिक स्पर्धेत उद्योगांना उतरवले गेले. सार्वजनिक क्षेत्राचा उत्पादन तसेच व्यापारातील सहभाग कमी करण्याचे प्रयत्न केले गेले (अपवाद अर्थात अशा क्षेत्रांचा जिथे बाजाराभिमुख व्यवहार शक्य होत नाहीत). वित्तक्षेत्रात बँकांवरील अनेक निर्बंध (कर्ज देण्याच्या प्रक्रियेवरील तसेच व्याजाच्या दरांसंबंधित) कमी करण्यात आले व स्पर्धा वाढण्याकरता परदेशी बँकांचा भारतामधील प्रवेश सोपा करण्यात आला. मात्र ह्याच वेळी बँकांचे मध्यवर्ती बँकेकरवी अधिक काटेकोरपणे नियमन होण्यासाठीची यंत्रणा निर्माण करण्यात आली. खुल्या अर्थव्यवस्थेच्या स्वीकाराचे प्रमुख उद्देश स्पर्धात्मक वातावरणाची निर्मिती (देशांतर्गत तसेच जागतिक पातळीवर), भटकजीवींची संख्या कमी करणे तसेच आर्थिक व्यवहार व व्यापार यामधील पारदर्शकता वाढविणे हे होते.

१९९१ साली स्वीकारण्यात आलेल्या खुल्या आर्थिक धोरणांमुळे आर्थिक वाढ झपाट्याने झाली हे एक निर्विवाद सत्य आहे. १९९१-९२ व १९९२-९३ ह्या वर्षांचा अपवाद वगळता सरासरी दरसाल आर्थिक वाढीचा दर ६.८% एवढा १९९० च्या दशकात राहिला. दरडोई उत्पन्न दरसाल सरासरी ४.३% ने वाढले. आधीच्या ४० वर्षांच्या तुलनेत बचत व गुंतवणुकीचे दरही मोठ्या प्रमाणात वाढले. परदेशी ऋणाचे आंतर्देशीय उत्पन्नाशी असलेले गुणोत्तर १९९१-९२ ते १९९८-९९ ह्या काळात ४१.०% पासून २३.४% पर्यंत घसरले. आयातीचे प्रमाण भरपूर वाढले असले तरी वाढत्या निर्यातीमुळे चालू खात्यातील तूट मर्यादितच राहिली. १९९०च्या दशकात भारताचा विदेशी चलनाचा साठा ३,००० कोटी डॉलर्स एवढा वाढला. ही वाढ सातत्याने आयातीचे प्रमाण वाढत असून व ऋणाचे प्रमाण कमी होत असताना झाली हे नक्कीच लक्षणीय आहे.

पण तरीही भारताच्या एकूण विकासासाठी खुल्या आर्थिक धोरणांमुळे मोठा फरक पडला आहे असे दुर्दैवाने म्हणता येत नाही. सामाजिक स्तरावरील विकासप्रक्रियेस ह्या नवीन धोरणाचा विशेष फायदा झालेला नाही. अजूनही एकतृतीयांश लोकांना आवश्यक असलेले किमान उष्मांकांचे अन्न मिळत नाही. प्रत्येक शंभर माणसांमधील १९ माणसांना स्वच्छ पाणी उपलब्ध नाही तर ८४ माणसांसाठी सुरक्षित स्वच्छतागृहे उपलब्ध नाहीत. १९९० च्या दशकात, बालमृत्यूंचे प्रमाण घटविण्याचे तसेच अपेक्षित आयुर्मर्यादा वाढविण्याचे विशेष प्रयत्न झालेले नाहीत. आर्थिक वाढ ही काही मर्यादित प्रदेशांमध्ये घडून आली आहे व सार्वजनिक क्षेत्रामधील बचत शून्यावर येऊन ठेपली आहे. सरकारी व्यय व कर्ज गोळा करण्याचे प्रमाण भरमसाठ वाढले असून, खासगी उद्योगांसाठी आवश्यक असलेल्या भांडवलाची उपलब्धता ह्यामुळे कमी झाली आहे. व्यवहारातील/व्यापारामधील पारदर्शकता पुरेशा प्रमाणात वाढलेली नाही व जगातील इतर देशांच्या तुलनेने "निरोगी स्पर्धात्मक वातावरणासाठी" भारताला मिळालेला क्रमांक चीन, मेक्सिको व द. आफ्रिकेपेक्षाही खालीच आहे. भ्रष्टाचारामध्ये मात्र भारतीय अर्थव्यवस्थेचा क्रमांक संपूर्ण जगामध्ये नववा आहे. प्राथमिक शिक्षणाचा प्रसार, आयुर्मर्यादा, बालमृत्यू व असे अनेक महत्त्वाचे निकष वापरून बनविलेल्या 'विकास' निर्देशांकात भारताचा क्रमांक एकूण १७४ देशांत १२८वा आहे. ही परिस्थिती खरोखरच खूप दारुण असे चित्र दाखविते.

वर दिलेल्या आर्थिक परिस्थितीच्या आढाव्यानंतर श्री. रॉय ह्यांच्या विचारांचा परामर्श घेणे योग्य ठरेल. श्री. रॉय ह्यांच्या आर्थिक विचारांत जनतेच्या गरजांना अग्रस्थान दिले आहे व ह्या भागविण्यासाठी लोकसत्ता व वैचारिक स्वातंत्र्य ह्यांच्या पायावर उभे राहिलेले आर्थिक नियोजन त्यांना अभिप्रेत आहे. भांडवलशाही पद्धतीत भांडवलदारांकडे येणारी अपरिमित सत्ता व नियोजित अर्थव्यवस्थेत (समाजवादी अर्थव्यवस्थेत) निर्माण होणारी राज्यकर्त्यांची हुकूमशाही त्यांना अमान्य आहेत. श्री. रॉय ह्यांनी पर्याय म्हणून 'सहकारी अर्थव्यवस्था' सुचविली आहे. ह्या अर्थव्यवस्थेत नफ्यासाठी उत्पादन या तत्त्वाला स्थान नाही. तसेच नियंत्रणाचे अनावश्यक केंद्रीकरणही तिच्यात असणार नाही. मात्र यंत्रे, तंत्रविद्या यांचा मोठ्या प्रमाणातील वापर तसेच मोठ्या प्रमाणात उत्पादन व भांडवली गुंतवणूक त्यांना अभिप्रेत आहेत. श्री. रॉय ह्यांना अतिरिक्त उत्पादनासाठी इतर देशांचा बाजार व त्यासाठी लागणारे नेतृत्वगुण अभिप्रेत आहेत.










श्री. रॉय ह्यांच्या आर्थिक विचारसरणीतील मानवतावाद हा हृद्य असला तरीही ह्यांनी सुचविलेल्या आदर्श अर्थव्यवस्थेत काही विसंगती प्रामुख्याने आढळतात. व्यक्तिस्वातंत्र्याच्या व भरभराटीच्या हेतूने प्रेरित झालेल्या अर्थव्यवस्थेत 'नफ्याचे स्थान' नाकारता येणार नाही. यंत्रे, तंत्रज्ञान ह्यांवर आधारित आधुनिक अर्थव्यवस्थेमध्ये उत्पादन वाढविण्यासाठी खासगी भांडवलाची सातत्याने वाढ होणे ही प्राथमिक गरज आहे.

ह्यासाठी विविध उद्योगांमधून पुरेसा नफा मिळणे आवश्यक आहे. अपेक्षित नफा मिळण्यासाठी उद्योग बाजाराभिमुख असणे व उत्पादकांस स्वतःच्या निर्मितिक्षमतेचा व औद्योगिक कसबांचा पुरेसा वापर करण्याची संधी मिळणे अत्यावश्यक आहे. ह्यासाठी श्री. रॉय ह्यांनी सुचविलेले व्यक्तिस्वातंत्र्य जितके आवश्यक आहे, तितकेच एक प्रेरक (incentive) म्हणून नफ्याचे स्थानहीं आवश्यक आहे.

श्री. रॉय ह्यांनी सुचविलेल्या सहकारी अर्थव्यवस्थेमध्ये इतर देशांबरोबर व्यापारी संबंध ठेवण्याची मुभा आहे. जर प्रतिस्पर्धी देश हे नफ्यासाठी उत्पादन करणारे असतील तर त्यांच्या उत्पादनपद्धतीत उत्पादनमूल्य (cost) कमी करण्याच्या दृष्टीने व मालाची आकर्षकता वाढविण्याच्या दृष्टीने सातत्याने प्रयत्न होत राहतील, अशा देशांबरोबर दीर्घ काळासाठी व्यापारी संबंध टिकविणे 'सहकारी अर्थव्यवस्थेवर' आधारित देशाला परवडणारे होणार नाही.

जगामध्ये ज्या ठिकाणी सहकारी तत्त्वांवर उद्योग चालविण्याचे प्रयत्न झाले आहेत तिथे ते मोठ्या प्रमाणात फसले आहेत. ह्या अपयशाचे प्रमुख कारण ह्या उद्योगांमधील बाजाराभिमुखतेचा अभाव व व्यावहारिक उद्दिष्टांमधील संदिग्धता हे अभ्यासकांच्या छाननीतून निष्पन्न झाले आहे. सहकारी तत्त्वांवर आधारित उद्योगांच्या यशासाठी वेगळ्या निकषांची गरज नाही. कुठल्याही व्यवसायविषयक कल्पनेचे पुरेसे संशोधन केल्याशिवाय, उत्पादनासाठी नक्की किती मागणी आहे ह्याचा अंदाज घेतल्याशिवाय आणि उद्योगासाठी लागणारे भांडवल उभारण्यासाठी त्या उत्पादनातून अपेक्षित असलेल्या नफ्याचे प्रमाण ठरविल्याशिवाय उद्योग उभा राहू शकत नाही व तो किफायतशीर होण्यासाठी व्यवहारकुशल संयोजकांची आवश्यकताही नाकारता येत नाही.

जगातील विविध देशांमध्ये झालेल्या आर्थिक प्रयोगांकडे पाहता असे म्हणावेसे वाटते की, संपूर्णतः भांडवलशाही किंवा समाजवादी अर्थव्यवस्था ह्या आदर्श पद्धती नाहीत, हे आता कळून चुकले आहे. भारताच्या सर्वांगीण विकासाचा प्रश्न हा केवळ सार्वजनिक क्षेत्राची व्याप्ती कमी करून वा उद्योगांचे खाजगीकरण केल्याने सुटणार नाही हेही १९९० च्या दशकाने दाखवून दिले आहे. प्रश्न केवळ सार्वजनिक विरुद्ध खासगी मालमत्तेचा नसून देशाच्या पातळीवर, उद्योगांच्या पातळीवर वा वित्तक्षेत्रात सामाजिक वास्तवाचे भान असलेले नेतृत्व मिळण्याचा आहे. तांत्रिक अर्थशास्त्राच्या पलीकडे जाणारे राजकीय प्रश्नही महत्त्वाचे आहेत. नागरी स्वातंत्र्य (civil liberties) व मानवी हक्क ह्यांतील व व्यवसाय/ बाजारपेठांमधील स्वातंत्र्य (म्हणजे मालमत्ताविषयक हक्क, किंमती व उत्पादनावर निर्बंध, मितवाटप (rationing) ह्यांतील नाते स्पष्ट होणे आवश्यक आहे. बाजाराभिमुख अर्थव्यवस्थेच्या वाढीसाठी निरोगी समाजाची गरज आहे आणि समाजाचे आरोग्य वाढविण्यासाठी अशा अनेक गोष्टी लागतात ज्यांचा समावेश आंतर्देशीय उत्पन्नाच्या व्याख्येत करता येणार नाही; उदाहरणार्थ व्यक्तिस्वातंत्र्य, मूलभूत मानवी हक्कांची जाणीव, सामाजिक नीतिमत्ता.

श्री. रॉय ह्यांच्या नवमानवतावादातील एक सूत्र हे भान अचूकपणे दाखवते. "व्यक्तिस्वातंत्र्य आणि नीती यांच्या वातावरणात नव्या समाजाचा सांस्कृतिक विकास होईल. विज्ञान आणि कला यांच्या विकासाचे नियमन राज्य करणार नाही. उलट, सर्व प्रकारच्या सर्जनात्मक प्रयत्नांना पूर्ण वाव व उत्तेजन मिळेल अशा प्रकारची परिस्थिती निर्माण करण्याचे प्रयत्न राज्य करीत राहील."

●●

अनुक्रमणिका

# अक्षरवेध

**एज्युकेशन अँड पीस** - जेन साही; अक्षर मुद्रा, पुणे ४११ ००७; प्रथमावृत्ती २०००; रु. १००/-

अध्यापक आणि कार्यकर्ते यांना वाटते, शिक्षणक्षेत्रात शिकवीत राहाणे महत्त्वाचे; तिथे सिद्धान्त, चिंतन यांचे काही काम नाही; पुरेशी साधने, व्यवस्थापन, सुनियोजन यांतून शिक्षण देता येईल.

खरे तर हे पुरेसे नाही. नव्या-जुन्या विचारांचे स्वागत करायला हवे, ते पारखून घ्यायला हवेत, प्रयोगाला सतत चिकित्सेची, चिंतनाची जोड द्यायला हवी. असे ज्यांना वाटते त्यांपैकी जेन साही ह्या शिक्षणक्षेत्रातील एक अनुभवी विचारवंत आहेत. त्यांच्या भाषणांचा आणि लेखांचा हा संग्रह शिक्षणाबद्दल नवी दृष्टी देईल.

जेन साही ह्या १९७५ पासून बंगलोरजवळ सिल्व्हेपुरा गावात एक छोटी पर्यायी शाळा (सीता स्कूल) चालवतात. परस्परसंवाद, सहकार्य, कलोपासना, जीवनसन्मुख कृती, सृजनशील कार्य अशा गोष्टींवर भर हा त्या शाळेचा विशेष आहे. त्यातून व्यावहारिक पण मूल्योन्मुखी शिक्षणाबाबतचे अनुभवाधिष्ठित चिंतन आहे.

यात मार्जरी साइक्स स्मारक व्याख्यानमालेतील दोन भाषणे आहेत. मार्जरी १९२८ मध्ये भारतात मिशनरी स्कूल मध्ये शिक्षिका म्हणून आल्या. त्यांच्यावर टागोर आणि महात्मा गांधी यांच्या विचारांचा प्रभाव पडला. गांधीजींच्या मूलोद्योग शिक्षणाच्या मांडणीत त्यांचा महत्त्वाचा सहभाग होता. क्वेकर पंथाची भारतातील सेवा, नागालँडमधील शांतिप्रस्थापना, रसुलिया येथील फ्रेंड्स रूरल सेंटर, टागोरांच्या काही नाटकांची भाषांतरे, सी.एफ्. अँड्र्यूजचे चरित्र अशी कार्ये त्यांच्याबाबत सांगता येतील. टागोर व गांधी यांच्या सहवासात साइक्स काही काळ होत्या. टागोर, गांधी आणि साइक्स यांच्या विचारसरणीचे प्रतिबिंबही त्यांच्या शैक्षणिक विचारात दिसते.

जेन साहींच्या मते शिक्षणाच्या मूलभूत पायावर दृष्टी केंद्रित केली पाहिजे. मुलांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास सर्वात महत्त्वाचा. त्यांचे जगणे, त्यांचा परिसराशी, लोकजीवनाशी संबंध, सहभाग ह्या गोष्टीही तेवढ्याच महत्त्वाच्या. जीवनातील बदलाची जाणीव आणि त्यानुसार प्रतिसाद शाळेत हवा. साहींच्या सर्व विचारांना त्यांच्या शाळेचा संदर्भ आहे.

नेहमीच्या शाळेत अनेक बंधने येतात. ती मुलांच्या विकासाला, विशेषतः आत्मिक उन्नतीला प्रतिकूल ठरतात. त्यामुळे व्यक्तिमत्त्वाचा समतोल ढळतो. साहींच्या मते शिक्षक संवेदनक्षम बागवानासारखा हवा. वनस्पती जीवनाची तत्त्वे आणि अहिंसाधिष्ठित शालेय जीवन ह्यांत त्या साम्य दाखवतात. चांगला माळी जमिनीचा विकासही नजरेआड होऊ देत नाही. अतिरिक्त पाणी, खत देऊन जमिनीचा कस बिघडतो हे तो जाणतो. तो पर्यावरण रक्षणाची काळजी घेतो. साही ही तत्त्वे अध्यापनपद्धतीस लावतात. नैसर्गिक शक्तीपासून दूर जाता नये. मुलांनी इतरांना दुर्लक्षिता कामा नये. परस्पर सहकार्यातून वाढावे; शिकावे. मुलांना सतत लाडाची, रक्षणाची, कौतुकाची गरज नसते. बियाण्यांची पुरी शक्ती पारखून घेतात; तसे मुलांमध्ये असणारी सृजनशीलता जाणून घ्यावी. (हे आजच्या शिक्षणपद्धतीत होत नाही ही खंत त्यांना आहे.)

मूर्ताकडून अमूर्ताकडे असल्या पाठाच्या टप्प्यांतून अंतर्ज्ञान, सृजनशीलता, मौलिकता जागवता-जपता येणार नाही. शिस्तीच्या नावाखाली नाहक बंधने घालून मुलांची मानसिक, शारीरिक शक्ती खर्च करता कामा नये. त्यांना सत्ये, तत्त्वे स्वतः शोधू द्या. मुकाट आज्ञापालन आणि परिस्थितीशी निमूट जुळते घेणे ही शिक्षणाची ध्येये नव्हेत.

समतोल विकासासाठी स्वातंत्र्य आणि स्थिरता यांबद्दलच्या कल्पना स्पष्ट हव्यात. केवळ स्वातंत्र्य व निवड नको. मुलानेही विकासाच्या मर्यादा आणि जीवनसंबद्धता या बाबी ओळखायला हव्यात. शाळांचे उद्दिष्ट मुलांना लायक प्रौढ बनवणे नव्हे; तसेच औद्योगिक गरजा पुरवणारा कामगार बनवणेही नव्हे.

अनुक्रमणिका






नेहमीच्या (सामान्य) शाळेमधील पद्धतशीर एकसुरी संस्कृती तयार होते ती उच्चभ्रूंनी अन्यांचे शोषण करावे, स्वतःचा स्वार्थ जपावा यासाठी! शाळेत अन्याय, हिंसा, भेदा-भेद यांना थारा नसावा. मुलांनी एकमेकांपासून, निसर्गापासून, लोकसंस्कृतीपासून दूर राहाणे योग्य नव्हे. माहिती, ज्ञान, शहाणपण यांतील भेद शिक्षकांनी ओळखायला हवा.

आपण परिणामांवर नियंत्रण ठेवू शकत नाही, प्रयत्न करीत राहू शकतो. स्वातंत्र्याला महत्त्व आहेच. पण बाह्य परिस्थिती शक्तिशाली असते हे ओळखायला हवे. माणसाने जबाबदारी स्वीकारावी, माणसाची नैतिकता आज धोक्यात आहे हे ओळखावे. बाजारी पद्धती माणसाचे कामच नव्हे तर जीवनशैली बदलून, बिघडून टाकतात. साही गांधीजींच्या मूलोद्योग शिक्षणपद्धतीचे महत्त्व सांगतात. हस्तकौशल्य सुप्त गुणांना वाव देते. श्रमशक्ती अत्यावश्यक. केवळ पुस्तकी ज्ञानाने विकास खुरटेल. शिक्षण सर्वसमावेशक हवे, जीवनसन्मुख, अहिंसाधिष्ठित हवे. चारित्र्य आतून यावे. व्यक्तिस्वातंत्र्याने मानवतेच्या सेवेला स्फूर्ती द्यावी. शिक्षक कल्पना लादणारा नसावा, विवेक जागवणारा हवा. मार्गदर्शक हवा. शिक्षणात लवचिकता, विविधता हवी. स्पर्धात्मकता नसावी, स्वार्थी वृत्ती नसावी. सहकार्याच्या रीती, संधी द्याव्यात. आत्मज्ञान हे सर्व ज्ञानशाखांचे उद्दिष्ट आहे हे शिक्षकांनी ओळखावे. शिक्षणाने अमानवीकरणाचा विरोध करावा. कल्पना, सहानुभाव आणि सृष्टीशी समरसता यातून अस्तित्वाशी संवादी व्यक्तिमत्त्वे घडतील.

वर्तमान स्थिती, परिसर यांशी लहान शाळा अधिक सन्मुख होतील. अभिव्यक्ती, जिज्ञासा, चिकित्सकवृत्ती यांना उत्तेजन देतील. शेती, बागकाम, मातीकाम, कागदकाम अशा छोट्या-मोठ्या कृतींतून खरे शिक्षण होते. ग्रामीण जीवनाशी सन्मुखता, पारंपरिक गोष्टी (भूगोल, वनस्पती, गावचा इतिहास, सण, गीते), परस्पर सहकार्य, परिसराचा आदर, स्वावलंबन, कौटुंबिक आस्था, सहकार्य अशा गोष्टींकडे शाळेने लक्ष द्यायला हवे.

मुलांना गोष्टींतून सत्य कसे शिकवावे हे सोदाहरण एका लेखात आहे. महागडी खेळणी मुलाची क्रीडाशक्ती खच्ची करतात. पण साध्या खेळण्यांतून त्यांचे शिक्षण अधिक प्रभावी, अर्थपूर्ण होते हे एका लेखात दाखवले आहे. अन्यत्र, परीकथा मुलांना प्रगल्भ कशा करतात याचे विवेचन आहे. 'कला अखेरीस ज्ञानमार्ग आहे' असे महत्त्वाचे विधान साही करतात.

आजकालच्या शाळांतून स्पर्धात्मकता, उदासीनता, सामर्थ्यक्षीणता, व्यक्तिकेंद्रितता अशा गोष्टींचा जन्म होतो. स्वतः लोकांनी आपल्या अडचणी सोडवाव्यात हा मुख्य विचार मूलोद्योग शिक्षणामागे आहे. तो आजही महत्त्वाचा आहे. आजच्या शाळा जीवनात टिकाव धरणाऱ्या (viable) नाहीत या खात्रीने साही नव्या शिक्षणाबद्दल काही मार्ग सुचवतात. त्यांमागे कृतीची जोड असल्याने ते डावलणे कठीण जाईल.

शिक्षणाबद्दलच्या दृष्टीत मूलभूत बदल करणारे, किमान नव्या विचारास प्रवृत्त करणारे हे पुस्तक शिक्षकांच्या अभ्यासक्रमात हवे.

***आ.ना. पेडणेकर***

●●

---

**मूल्यशिक्षण** - सुमन ओक; प्रयास, पुणे, २०००; रु. २५/-

---

प्रत्येक पिढीतील वयस्कर व्यक्तींची पुढच्या तरुण पिढीच्या नीतिमूल्यांबद्दल काही ना काही तरी तक्रार असते. तसेच प्रत्येक वयस्कर व्यक्तीला आपण आपल्या पाल्यावर योग्य संस्कार करू शकलो नाही, याची पण खंत वाटत असते. या सर्व प्रकारात संस्कार म्हणजे काय? नीतिमूल्ये म्हणजे काय? कोणती मूल्ये जीवनमूल्ये म्हणून स्वीकारावीत? मूल्ये स्थल-काल-व्यक्ती निरपेक्ष असू शकतात का? मुळात ती शिकवता किंवा शिकता येतात का? असे अनेक प्रश्न आपल्या समोर उभे राहतात. या व इतर अनेक प्रश्नांच्या उत्तरांचा शोध सुमन ओक यांनी घेतला असुन प्रत्येक शिक्षक, शिक्षिका व पालकांनी वाचला पाहिजे असा हा दीर्घ निबंध आहे.

सुमन ओक एखाद्या कसलेल्या संशोधिकेप्रमाणे मूल्य-शिक्षणाची सर्व बाजूंनी तपासणी करून शिक्षक व पालक म्हणून याविषयी आपली काय जबाबदारी आहे याची जाणीव

करून देतात. सामान्यपणे धर्माचे परिपालन, म्हणजेच संस्कार व रूढी परंपराचे तंतोतंत पालन म्हणजेच नीतिमूल्ये असे अनेकांना वाटत असते. खरे पाहता धर्मशास्त्राव्यतिरिक्त अनेक शास्त्रांचा नीतिमूल्यांशी घनिष्ठ संबंध आहे. तत्त्वज्ञान, जीवशास्त्र, मानसशास्त्र, इतिहास, मानववंशशास्त्र, संस्कृती अशा नानाविध ज्ञानशाखांतून नीतिमूल्यांचा ऊहापोह केलेला असतो. परंतु प्राथमिक अवस्थेतील मनुष्यप्राण्यासारखेच अजूनही आपण नैसर्गिक घटनांच्या कार्य-कारणांचा विचार न करता सोपी कर्मकांडे, पूजा-अर्चा, व्रत-वैकल्ये इत्यादिंनाच धर्म म्हणून कवटाळत आहोत व त्यांनाच जीवनमूल्ये असे समजत आहोत. यामुळे आपली मानसिकवृत्ती पलायनवादी होत आहे. वर्तमानकाळातील ऐहिक जीवनापेक्षा मरणोत्तर मोक्षाच्या मृगजळाच्या पाठीमागे जाण्यास प्रवृत्त केले जात आहे. त्यामुळे जीवनमूल्यांच्या बाबतीत गोंधळल्यासारखे, नेमके काय करावे हे कळेनासे झाले आहे.

इंदुमती पारीख यांनी या पुस्तिकेच्या प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे या पुस्तिकेचा रोख याच जगात, याच जीवनात यशस्वी होण्यासाठी लागणारी नीतिमत्ता कशी असेल व त्यासाठी काय करायला हवे याचा विचार करण्यास वाचकांना प्रवृत्त करण्याचा आहे. विज्ञान-तंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे आपली समाजरचना व वैयक्तिक जीवन जास्त गुंतागुंतीचे होत चालले आहे. अशा जीवनपद्धतीस सुसंगत ठरेल अशी प्रगती वा कालानुरूप बदल मात्र नैतिकतेमध्ये होत नाही. त्यामुळे निर्माण झालेली सांस्कृतिक दरी भरून काढायची म्हणजेच प्रत्येकाने जाणतेपणाने आपापली मूल्यप्रणाली निर्माण करायची व ती आचरणात आणायची. तसेच इतरांनाही या वस्तुस्थितीची जाणीव होण्यास मदत करायची.

मूल्यांचा ऱ्हास का होत आहे याचा शोध घेताना कुटुंब, धर्मसंस्था व शिक्षणसंस्था नैतिक शिक्षण देण्याबाबत अपयशी ठरल्या आहेत असे लेखिकेला वाटते. "सामाजिक उत्क्रांतीमुळे मानवी समाजरचना गुंतागुंतीची, स्तरांमध्ये विभाजित व विषमतापूर्ण होऊ लागली व प्रत्येक बदलाबरोबर जुन्या मूल्यांची जागा नवीन मूल्ये घेऊ लागली."

मूल्यप्रणाली परिवर्तनशील असावी यावर भर देताना लेखिकेने मूल्यप्रणालीत कसे बदल होत गेले याचा काही तक्त्यांच्या आधारे सुरेख आढावा घेतला आहे. विचार केला तरी रोजच्या व्यवहारातील आचारांच्या नियंत्रणासाठी एखादी आचारसंहिता वा निर्णयप्रक्रिया यांना काही महत्त्व दिलेले जाणवत नाही. हिंदू धर्म व इतर धर्म यात कुठल्या नैतिक मूल्यांना अग्रक्रम दिला जातो याची नोंदही लेखिकेने घेतलेली आहे.

स्वातंत्र्योत्तर काळात शिक्षणपद्धतीत सुधारणा करण्यासाठी नेमलेल्या राधाकृष्णन, कोठारी व मुदलियार आयोगांनी नीतीमूल्यांच्या ऱ्हासाची दखल घेऊन काही सुधारणा सुचवल्या होत्या. राजीव गांधींच्या काळात 'शिक्षणाचे आव्हान' हा बहुचर्चित निबंध सादर केला होता. स्वार्थत्याग, धैर्य, अस्मिता, मानसिक स्वातंत्र्य, विचारप्रवणता, चिकित्सक वृत्ती, भावनिक शिक्षण, स्वनियंत्रित इच्छाशक्ती, राष्ट्रप्रेम, सांस्कृतिक एकात्मता इत्यादी मूल्यांवर भर देत असतानाच, संस्कृती, राष्ट्रीयता व परंपरा इत्यादींची केवळ कदर करण्यावर न थांबता त्यांचे विश्लेषण करावे व त्यातील दुर्बळ, प्रतिगामी गोष्टींचा त्याग करावा अशी शिफारसही केली होती. अध्यात्मिकतेतून बुद्धिप्रामाण्यवादाकडे ही वाटचाल असावी यावर सर्व शिक्षणतज्ज्ञांचे एकमत होते. मानवतावाद, मानवी मूल्ये व वैज्ञानिक दृष्टिकोन ही मूल्ये रुजविल्यास धार्मिकता, अध्यात्मिकता व त्याचे अपत्य असलेली भिक्षावृत्ती यातून पुढची पिढी मुक्त होण्याची शक्यता आहे, असे लेखिकेला वाटते.

सध्याच्या धार्मिक व मूलतत्त्ववादाच्या उन्मादाच्या मगरमिठीतून सुटका होण्यासाठी मानवी परिस्थितीतच मूल्यांचे स्रोत शोधणे गरजेचे आहे. यासाठी वर्तनवादीशास्त्र, जनुकशास्त्र, मानववंशविज्ञान, पर्यावरण या विज्ञानशाखांकडे वळायला हवे. लेखिकेच्या मते मेंदूची विशिष्ट रचना, तसेच जनुकीय परिणामांची दखल घेतल्याशिवाय मानवी प्रेरणांची उकल होणार नाही. मानवी प्रेरणांची उत्क्रांती व विकास याबद्दलचा एक तक्ता लेखिकेने पुस्तकात जोडला आहे. एकपेशीय प्राण्यापासून प्रगत मानवापर्यंतच्या उत्क्रांतीचा आढावा घेत असताना त्यांच्या प्रेरणेत कशा प्रकारे बदल होत गेला याचे एक चित्र तिने उभे केले आहे.

मुला-मुलींच्या भावनिक विकासाकडे शिक्षक वा पालक पुरेसे लक्ष देत नाहीत अशी खंत लेखिका व्यक्त करते. मुला-मुलींचे ज्ञान व बौद्धिक क्षमता यांचे मूल्यमापन नेहमी केले जाते. परंतु भावनिक विकास, त्यांचा वर्तनावर होणारा परिणाम, एखाद्या कृतीमागील प्रेरणा यांचेही मूल्यमापन करणे गरजेचे आहे. नाही तर शाळांमधून देत असलेल्या

अनुक्रमणिका

मूल्यशिक्षणाला अर्थ राहत नाही. उदाहरणार्थ, मनुष्य स्वभावानुसार राग येणे काही वेळा आवश्यक आहे. पण तो योग्य कारणांसाठी, योग्य वेळी व योग्य प्रकारेच व्यक्त झाला पाहिजे. योग्य कृतीत त्याची परिणती झाली पाहिजे. भावनांच्या उद्रेकामुळे उत्पन्न होणारा मानसिक त्रास कसा हाताळायचा, त्याचा मुकाबला कसा करायचा यावर भर देणे हाही मूल्यशिक्षणाचा भाग बनला पाहिजे. भावनोद्रेकामुळे उत्पन्न होणारे मानसिक त्रास केवळ वैयक्तिक बाब म्हणून दुर्लक्ष करता येत नाहीत. कारण त्याचे परिणाम सामाजिक मूल्यप्रणालीवर होऊ शकतात. त्यामुळे मूल्यांचे स्पष्टीकरण, मूल्यप्रणालींचा विकास, मूल्यांमधील संघर्ष यांचाही परिचय मूल्यशिक्षणाचा भाग झाला पाहिजे.

२५-३० पानांची ही पुस्तिका आशयघन असून आज आपल्यासमोर आवासून उभे राहिलेल्या नवीन पिढीतील मूल्यांच्या ऱ्हासाबद्दलच्या प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा हा एक स्तुत्य व प्रामाणिक प्रयत्न लेखिकेने केला आहे. या दीर्घ निबंधाबद्दल सुदीर्घ चर्चा होऊन काही ठोस पावले उचलल्यास पुढची पिढी नक्कीच आपल्याला कृतज्ञ राहील!

***प्रभाकर नानावटी***

●●


**Form IV**

रूल नं. ८, रजिस्ट्रेशन ऑफ न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वये प्रकाशित

| | | |
|---|---|---|
| **प्रकाशन स्थळ** | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **प्रकाशन दिनांक** | : | दरमहा १ तारीख |
| **मुद्रक** | : | श्रीकृष्ण गजानन दीक्षित, व्यवस्थापक, *नवभारत* मासिक |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **पत्ता** | : | द्वारा – प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **प्रकाशक** | : | सीताराम रामचंद्र रायकर, चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई. |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **पत्ता** | : | द्वारा – प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **संपादक** | : | वसंत विष्णू पळशीकर |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **पत्ता** | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **मालक** | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |

मी, सीताराम रामचंद्र रायकर जाहीर करतो, की वर दिलेली माहिती माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे संपूर्णतः खरी आहे

**सीताराम रायकर**

प्रकाशक


अनुक्रमणिका

## साभार पोच



१. *रेडिओवरील भाषणे आणि श्रुतिका* (भाग १ व २) — पु.ल. देशपांडे; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे १९०; रु. १२५/-.

२. *मुक्काम शांतिनिकेतन* — पु.ल. देशपांडे; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे १६३; रु. १२५/-.

३. *एकशून्य मी* — पु.ल. देशपांडे; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती - जून २००१; पृष्ठे १९२; रु. १२५.

४. *वादळ* — मंगेश पाडगांवकर; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती - एप्रिल २००१; पृष्ठे १३०; रु. १५०/-.

५. *श्वेतकमळ* — कृष्णा चौधरी; पूर्वा प्रकाशन, नागपूर; प्रथामवृत्ती २००१; पृष्ठे ७९; रु. ५०/-.

६. *सामाजिक कार्याच्या दिशा* — नागोराव कुंभार; प्रबोधन प्रकाशन, लातूर; प्रथमावृत्ती - ऑक्टो. २०००; पृष्ठे ८३; रु. ६५/-.

७. *कालमीमांसा* — अरुण टिकेकर; श्रीविद्याप्रकाशन, पुणे; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे २२६; रु. २००/-.

८. *वेदांतील विज्ञान* — धनंजय देशपांडे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; प्रथमावृत्ती २००१, पृष्ठे २८८; रु. २७५/-.

९. *सामर्थ्याचा स्वर* — प्रा. देवानंद सोनटक्के, सुधा मुनघाटे, गंगा-हिल टॉप, अंबाझरी, नागपूर १०; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे १४४; रु. ७५/-.

१०. *अनुभवामृत* — ग.वा. तगारे; 'मंदार', माधव पेठ, मिरज-सांगली; प्रथमावृत्ती सप्टें. २००१; पृष्ठे ११३; रु. ७५/-.

११. *मेक्सिकोपर्व* मीना प्रभु; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे २७७; रु. २५०/-.

१२. *अवकाश* — सानिया; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती ऑक्टो. २००१; पृष्ठे १४७; रु. १२५/-.

१३. *जीवनायन* — यशवंत मनोहर; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती - एप्रिल २००१; पृष्ठे ८७; रु. ७०/-.

१४. *साहित्य, विचार आणि सौंदर्यशास्त्र* — रा.भा. पाटणकर; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे २११; रु. १५०/-.

१५. *सोव्हिएत साम्राज्याचा उदय आणि अस्त* (खंड ४) — गोविंद तळवलकर; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती - ऑक्टो. २००१; पृष्ठे ३९६; रु. ३५०/-.

१६. *नाणेनिधी व जागतिक बँक यांचा नव-वसाहतवाद* — चंद्रकांत केळकर; लोकवाङ्मयगृह, मुंबई; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे २७३; रु. २५०/-.

१७. *समिधा* — साधना आमटे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; प्रथमावृत्ती २००२; पृष्ठे १५८; रु. २००/-.

१८. *युगप्रवर्तक बाळशास्त्री जांभेकर : काळ आणि कर्तृत्व* — नीला उपाध्ये; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; प्रथमावृत्ती २००२; पृष्ठे १५८; रु. १८०/-.

१९. *साहित्यिक खसखस* — अरुण नासिककर; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे १२३; रु. १००/-.

२०. *प्रश्न आणि प्रश्न* — अनिल अवचट; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे २२६; रु. १५०/-.

२१. *झळाळ* — वासंती मुझुमदार; मौज प्रकाशनगृह, मुंबई; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे २०४; रु. १५०/-.

२२. *संगणकयुगातील आरोग्य* — डॉ. मंदार राजाराम जोशी; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; प्रथमावृत्ती २००१; रु.००/-.

२३. *भाषण व नाट्यविषयक विचार* — अशोक दा. रानडे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; प्रथमावृत्ती २००१; पृष्ठे १७१; रु. १६०/-.

२४. *ज्ञानेश्वरीतील काही उपमाने* — रं.शा. लोकापुर, बेळगांव; प्रथमावृत्ती - जाने. २००१; पृष्ठे १६०; रु. १२०/-.

●●

अनुक्रमणिका

# प्रा. मे.पुं. रेगे यांचे तत्त्वज्ञान

**प्रा. रेगे यांच्या तत्त्वज्ञानात्मक लिखाणाचे टीकात्मक परीक्षण करणाऱ्या लेखांचा संग्रह**

**संपादक : डॉ. सुनीती देव**
तत्त्वज्ञान-विभाग-प्रमुख, नागपूर विद्यापीठ, नागपूर

प्रा. दि.य. देशपांडे, डॉ. शि.स. अंतरकर, डॉ. ल.ग. चिंचोळकर, प्रा. प्र.ब. कुलकर्णी, डॉ. बा.य. देशपांडे, डॉ. सुनीती नी. देव, डॉ. सौ. उषा गडकरी, डॉ विवेक गोखले यांनी प्रा. रेग्यांच्या तत्त्वज्ञानात्मक लेखनाची केलेली समीक्षा आणि या समीक्षेवर प्रा. रेगे यांची टिप्पणी

**'तत्त्वज्ञानातील माझी वाटचाल' हा प्रा. मे.पुं. रेगे यांचा या ग्रंथासाठी लिहिलेला विशेष लेख**
प्रा. रा.भा. पाटणकर यांनी प्रा. रेगे यांच्या व्यक्तिमत्त्वाची करून दिलेली मर्मग्राही ओळख.

प्रा. रेगे यांच्या प्रकाशित मराठी व इंग्रजी साहित्याच्या संपूर्ण सूचीसह

**प्रकाशन : डिसेंबर २०००** **पृष्ठे : डेमी, २५३**

**किंमत : रु. २२५/-**

**प्रकाशक**
डॉ. सुनीती देव
३/४, कर्मयोग अपार्टमेंट,
सुशीला बलराज मार्ग,
धन्तोली, नागपूर ४४० ०१२

**वितरक**
राजहंस प्रकाशन,
१०२५ सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०



अनुक्रमणिका

हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ... केले.



अनुक्रमणिका